पंचब्रह्म पंचदेवं पंचस्थानेषु पंचधा ।
पंचमातृकाः पंचवाक्यं पंचशून्यं तथैव च ॥ २ ॥

पांच ब्रह्में, पांच देव, पांच जागा संस्थापित केले; पांच प्रकारच्या वस्तु-पांच जागा, पांच मातृका, पांच वाक्यांचा समूह व पांच प्रकार मिळून जें एक शून्य-प्रभु परमेश्वरानें निव्वळ आपल्याच संकल्पानें निर्माण केलीं आहेत ॥२ ॥

पंचावस्थाः पंच देहाः पंच मात्राः सुसंस्थिताः ॥
। वेदाः पंच गुणाः पंच पद्मास्तथ परे ॥ ३

पंच भूतः पंच क्रियाः पंच दिक् पंच वेदिकाः
पंच कोणाः पंच ऋचः पंच प्रमाणसंज्ञकाः ॥ ४
पंचांगं च पृथग्वर्ण पंच मुद्रादि गुप्तक्रम् ॥
पंच कलाः पंच मार्गाः पंचधाऽकाश्याम च ॥५

## अध्याय पहिला.

देहस्थपंचस्थानं च ब्रह्माण्डस्थानपंचकम् ॥
सर्वेब्रह्माण्डनिलयाः पंच लोकनिवासिनः ॥ ६ ॥
देहाभिमानिनः पंच पंच वाद्यमतः परं ॥
पंचपदी च गायत्री पंचायतनदेवता ॥ ७ ॥
पंच शक्तिसमायुक्ता विचारः पंचनिर्णयः ।
पंचाग्नि पंच नामांतदीक्षकाः ॥ ८ ॥
पंचत्रिंशत् पंचकानि तारकाभ्यन्तरेष्वपि ॥
शतं चापि शतार्द्धार्धं शुद्धं श्रुत्वा गुरोर्मुखात् ॥९॥
न तस्यपुन ावृत्ति जन्ममृत्युभयं हरेत् ॥
निजमोक्षार्थसंसिद्धिर्बंधमोक्षार्थदं शुभम् ॥ १० ॥

पांच स्थिति, पांच देह, उत्तम तऱ्हेनें प्रस्थापित झालेल्या असलेल्या पांच मात्रा, पांच वेद, पांच गुण, पांच भानें (पर्वे) ॥ ३ ॥ पंचमहाभूतें, पांच क्रिया, पांच

दिशा, पांच वेदिका, पांच कोण, पांच ऋचा, प्रमाण संज्ञक पंचक ॥ ४ ॥ पांच अंगें ( पंचांग ह्मणजे स्वतःचा देह, अगर ज्योतिष पंचांग ), पांच निरनिराळे वर्ग, पांच मुद्रा आरंभीं आहेत अशा पांच गुप्त कला, धर्मांत वागण्याचे महर्षींनीं घालून दिलेले पांच मार्ग, पांच प्रकारचीं आकाशस्थानें ॥ ५ ॥ देहांतील पांच जागा, ब्रह्मांडांतील पांच स्थलें, ब्रह्मांडस्थित पंचलोकांत वास्तव्य करणारे सर्व ॥ ६ ॥ पांच देहाभिमानी, पंच वाद्यें, पांच पायांची गायत्री, देवतापंचायतन ॥ ७ ॥ पांच शक्ती, पंच विचार, पांचामुखी परमेश्वरी निर्णय, पंचाग्नि, पांच तऱ्हांचे आनंद, आणि पांच नामें याप्रमाणें पंस्तीस पंच तारकां मध्यें आहेत ॥ ८ ॥ भवबंधापासून मुक्त व्हावयाचें असल्यास गुरुमुखांतून या ग्रंथांतील शंभर किंवा निदान पन्नास

श्लोक तरी सार्थ ऐकावेत ॥ ९ ॥ ऐकणाराला पुन्हां संसारांत पडावें लागणार नाहीं, जन्ममृत्यूचें भय रहाणार नाहीं आणि आत्ममोक्षाची सिद्धि करणारें ह्मणजेच भवबंध नाहींसा करणें हा जो पुरुषार्थ तोच यामुळें उत्तम गति–उत्तम फळ देणारा आहे ॥ १० ॥

श्री पद्मपुराणांतील कपिलगीतेचा
पहिला अध्याय येथें संपला.

---

## अध्याय दुसरा.

तारकं दंडकं चैव कुंडल्यं चार्धचंद्रकम् ॥
पंचमं बिंदुसंकाशं पंचब्रह्म सनातनम् ॥ १ ॥

सनातन पंचब्रह्म कसें आहे ? तर—तारक, दंडक, कुंडल्य, अर्ध चंद्रक, पांचवें बिंदुसंकाश असें आहे ॥ १ ॥

ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च ईश्वरश्च सदाशिवः ॥
पंच देवं तु विख्यातं पंचब्रह्मस्वरूपवत् ॥२॥

पांच ब्रह्मस्वरूपाप्रमाणेंच—ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर आणि सदाशिव हें पंचायतन प्रसिद्ध आहे ॥ २ ॥

अकारश्च उकारश्च मकारश्च त्रिमातृकम् ॥
इकारश्चैव एकारः पंचकं मातृसंज्ञितम् ॥ ३ ॥

ॐकारांत असणाऱ्या—अकार, इकार, उकार, मकार व
कार—ह्या पांच प्रकारच्या मात्रा मातृसंज्ञक आहेत ॥३॥

त्रिकूटं श्रीहटं स्थानं गोल्हाटं चौटपीठकम् ॥
पुण्याद्रिर्भ्रामरी गुंफा ब्रह्मरंध्राण्यनुक्रमात् ॥ ४ ॥

अनुक्रमानें—श्रीकूट, श्रीहट, गोल्हाट, औटपीठ,
ण्याद्री, भ्रामरी व गुंफा—हीं ब्रह्मरंध्रें आहेत ॥ ४ ॥

वैखरी मध्यमा वाचा पश्यंती च तथा परा ॥
परात्परा च विज्ञेया वाचा पंचकसंज्ञिता ॥ ५ ॥

पांच ज्या वाणी—वैखरी, मध्यमा, पश्यंति, परा व परा-
रा—त्यांपैकीं परात्परेचा महिमा अवर्णनीय आहे ॥ ५ ॥

धःशून्यं चोर्ध्वशून्यं हि मध्यं सर्वं शून्यं शून्यमिहांत-
न्यम् ॥ चतुःशून्यागोचरं यन्निशून्यं निर्नामशून्यं हि
रामयं च ॥ ६ ॥

अधः शून्य, ऊर्ध्व शून्य, मध्यशून्य, सर्वशून्य आणि पांचवें अंतःशून्य अशीं हीं पांच आहेत; परंतु यांतील फक्त पहिलीं चारच जाणतां येतात पांचवें शून्य चारी शून्यांचा विषय होणारें नसून—निःशून्य, निर्नामशून्य आणि निरुपद्रव असें आहे ॥ ६ ॥

जाग्रत्स्वप्नः सुषुप्तिश्च तुर्यावस्था च उन्मनी ॥
सा चैव सहजावस्था पंचमस्थाः प्रकीर्तिताः ॥७॥

जाग्रत, स्वप्न, सुषुप्ति, तुर्या व उन्मनी अशा पांच अवस्था जरी प्रसिद्ध आहेत तरी त्यांतील पहिल्या चार सकारण असून पांचवी स्वाभाविक आहे ॥ ७ ॥

स्थूलं सूक्ष्मं कारणं च महाकारणकं परम् ॥
कैवल्यज्ञानदेहश्च पंच देहाः प्रकीर्तिताः ॥ ८ ॥

स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण आणि कैवल्यज्ञान

देह असे देहाचे पांच प्रकार सांगितलेले असून त्यांत शेवटचा प्रकार अत्यंत शुद्ध व निराकार स्वरूप आहे. ॥ ८ ॥

ऱ्हस्वमात्रा दीर्घमात्रा प्लुतमात्रा त्रिभेदतः
अर्धमात्राऽप्यनुच्चार्या मात्राः पंचकसंज्ञिताः ॥ ९॥

ऱ्हस्व मात्रा, दीर्घ मात्रा, प्लुत मात्रा, अर्ध मात्रा आणि अनुच्चार्य मात्रा असे मात्रांचे पांच प्रकार आहेत ॥ ९ ॥

ऋग्वेदोऽथ यजुर्वेदः सामवेदोह्यथर्वणः ॥
सूक्ष्मवेदो हि चाध्यक्षः पंच वेदाः प्रतिष्ठिताः ॥१०॥

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वणवेद आणि सुक्ष्मवेद असे पांच वेद असून त्यांतला मुख्य सुक्ष्मवेद आहे ॥१०॥

रजः सत्वं तमश्चैव शुद्धसत्वं चतुर्थकम् ॥
निर्गुणं सगुणातीतं पंचमं सुप्रतिष्ठितम् ॥११॥

रज, सत्व, तम, शुद्धसत्व आणि अत्यंत प्रतिष्ठित असा पांचवा निर्गुण असे गुणांचे पांच प्रकार आहेत ॥ ११ ॥

रक्तं श्वेतं तथा श्यामं नीलं सुनीलपंकजम् ॥
पंचमं शुद्धपीतं च तस्यांते श्वेतमुज्ज्वलम् ॥१२॥

रक्त, श्वेत, श्याम, निळ्या कमळाप्रमाणें नील आणि शुद्धपति असे पांच वर्ण आहेत ॥ १२ ॥

पृथिव्यापस्तथा तेजो वायुराकाशमेव च ॥
पंच भूतानि कल्प्यंते पंच भूताः सुनिश्चिताः ॥१३॥

पृथ्वी, आप, तेज, वायु, आणि आकाश अशा ह्या पंच भूतांची कल्पना केलेली असून ती शाश्वत आहे ॥ १३ ॥

सर्जनं पालनं चैव प्रलयश्च तृतीयकः ॥
सूर्यक्रिया चंद्रक्रिया क्रियाः पंचकसंज्ञिताः ॥१४॥

सर्जन, मार्जन, प्रलय, सूर्यक्रिया आणि चंद्रक्रिया अशा पांच क्रिया आहेत ॥ १४ ॥

पूर्वेंद्रः पश्चिमदिशा वरुणः प्रसिद्धो धर्मश्च दक्षिणादिशोत्तर दिक् कुबेरः ॥ उर्ध्वा हि पद्मजननो जगतो विधाता एवं दिशोथ पतिदैवतपंचकं च ॥१५॥

पूर्वेस इंद्र, पश्चिमेस वरुण, दक्षिणेस यम, उत्तरेस कुबेर आणि उर्ध्व दिशेस जगाला उत्पन्न करणारा विधाता असे हे पांच दिशांचे पांच देव स्वामी आहेत ॥ १५ ॥

नैर्ऋत्यकोणं निर्ऋतीश्वरमीशकोणमाग्नेयकोणमधिदैवतमग्निदेवः ॥ वायव्यकोणमधिदैवतवायुदेवश्चाधोदिशा अथ च दैवतमत्र विष्णुः ॥१६॥

नैर्ऋत्य कोणांत निर्ऋति, ईशान्य कोणांत ईश्वर, आग्नेय

कोणांत अग्नि, वायव्य कोणांत वायु व अधोदिशेंत विष्णु दैवत व स्वामी अशीं पांच दैवतें आहेत ॥ १६ ॥

सद्योजातं वामदेवाय चेति तत्पुरुषायेति चेशा
नमंत्रः ॥ रेभ्योऽथ घोरेभ्य इति ब्रह्म ॥ यजुः
श्चेशानः पंचवक्त्रं पुरस्तात् ॥ १७ ॥

सद्योजातं०, वामदेवाय०, तत्पुरुषाय०, ईशानः०. अघोरेभ्योऽथ घोरेभ्यः०, वगैरे यजुर्वेदाच्या मंत्रांत—सद्यो, जात, वामदेव, तत्पुरुष, ईशान आणि अघोर व घोर अशीं परमेश्वरांचीं पंच मुखें वर्णिलीं आहेत ॥ १७ ॥

सार्धत्रिहस्तो यदि स्थूल भोगो ॥ ह्यंगुष्ठमात्र
प्रमितं हि लिङ्गम् ॥ पर्वार्धमात्रं मसुरप्रमाणम् ॥
प्रमाणहीनं हि भवेत्प्रमाणम् ॥ १८ ॥

साडेतीन हात लांबीचा जो देह तोच स्थूल देह होय

लिङ्ग देह अंगुष्ठप्रमाण असून कारण देह अर्ध्या पोर एवढा असतो. महाकारण देह मसुरे एवढा असून पांचवा देह प्रमाणरहित आहे. ॥ १८ ॥

पृथक् रक्तपीतं तथा शुभ्रवर्णम् ॥ तथा कर्बुरं श्यामवर्णादिभूनम् ॥ नीलं सुनीलं शुद्धपीतं सुशुभ्रम् ॥ तथा पंचमं पीतवर्णं पुरस्तात् ॥१९॥

लाल, पिवळा, शुभ्र, चित्रविचित्र आणि काळा हे मुख्य पांच रंग असून—नील, अतिशय नील, शुद्ध पिवळा, अतिशय शुभ्र वगैरे इतर वरील पांचांचेच प्रकार आहेत ॥ १९ ॥

खेचरी भूचरी चैव चाचरी च अगोचरी ॥
उन्मनी चेति विख्याताः पंच मुद्राः प्रकीर्तिताः ॥२०॥

खेचरी, भूचरी, चाचरी, अगोचरी आणि उन्मन

अशा पांच मुद्रा प्रसिद्ध आहेत ॥ २० ॥

षण्मुखी चोन्मीलिनी च शांभवी चात्मभाषिणी ।
पूर्वबोधप्रबोधी च पंच गोप्या हि मुद्रिकाः ॥२१॥

षण्मुखी, उन्मीलिनी, शांभवी, आत्मभाषिणी आणि पूर्वबोधप्रबोधी अशा पांच अत्यंत गुप्त अशा मुद्रा आहेत ॥ २१ ॥

ऊर्मी चैवापि धूम्री च ज्योतिज्वाला चतुष्कला ।
कलातीता कलाः प्रोक्ताः पंच वै सुप्रतिष्ठिताः ॥२२॥

उर्मी, धूम्री, ज्योतिर्ज्वाला चतुष्कला आणि कलातीता अशा ह्या पांच उत्तम कला सांगितल्या आहेत ॥ २२ ॥

पिपीलिका विहङ्गश्च कपिमार्गो हि मीनकः ॥
शेषमार्गो हि संख्यायां पंच मार्गाः पुरातनाः॥२३॥

पिपीलिका, विहंग, कपि, मत्स्य आणि शेष असे

पांच पुरातन मार्ग सांगितले आहेत ॥ २३ ॥

घटाकाशमठाकाशमहदाकाशसंज्ञितम् ॥

चिदाकाशं निराकाशमाकाशपंचकं विदुः ॥ २४ ॥

घटाकाश, मठाकाश, महदाकाश, चिदाकाश आणि निराकाश असे पांच प्रकारचे आकाश सांगितले आहेत ॥ २४ ॥

नेत्रं कंठोऽथ हृदयं मूर्धा स्थानान्यनुक्रमात् ॥

शिखायां पंचमं स्थानं पंचस्थानं प्रकीर्तितम् ॥२५॥

जाग्रति, स्वप्न, सुषुप्ति व समाधी यांचीं अनुक्रमें—नेत्र, कंठ, हृदय आणि मूर्धा हीं स्थानें सांगितलीं असून पांचवें स्थान शिखेंत सांगितलें आहे ॥ २५ ॥

सत्यवैकुंठकैलासमाश्रयो हि चतुर्थकः ॥

निराश्रयः पंचमश्च पंच लोकाः प्रतिष्ठिताः ॥२६॥

मृत्यु, वैकुंठ, कैलास, आश्रय व निराश्रय असे पांच लोक प्रसिद्ध आहेत ॥ २६ ॥

विश्वतैजसप्राज्ञाश्च प्रत्यगात्माभिमानिनः ॥
निरंजनस्तदातीतः सोऽभिमानी तु पंचमः ॥ २७॥

विश्व, तैजस, प्राज्ञ, प्रत्यगात्मा आणि निरंजन हे पांच पंचदेहांवर अभिमान ठेवणारे आहेत ॥ २७ ॥

तंतिवीणा वितन्तश्च मृदंगघनकांस्यकम् ॥
सुस्वरो वंशिकानादोऽनाहतो वाद्यपंचकम् ॥२८॥

तंतिवीणा, वितंत, मृदंग, घनकांस्य आणि पांचवा अनाहत असा सुस्वर वेणुनाद हीं वाद्यें व त्यांचे पंचनाद सांगितले आहेत ॥ २८ ॥

गायत्र्याः प्रथमः पादो द्वितीयश्च तृतीयकः ॥
चतुर्थपाद ॐकारः पंचमः परमार्थकः ॥ २९ ॥

गायत्रीचा–पहिला, दुसरा व तिसरा असे तीन पाद सांगितले असून तिचा चवथा पाद ॐकार हा वर्णिला आहे. गायत्रीचा पंचम पाद परमार्थपर आहे ॥ २९ ॥

गणेशो भास्करो विष्णू रुद्रशक्ती च शाश्वता ॥
देवगर्भेषु पूज्यन्ते पंचायतनदेवताः ॥ ३० ॥

गणपती, सूर्य, विष्णु, शिव आणि शक्ती या पांच देवता वेदांत सांगितल्या असून, वैदिक त्यांची पूजा करितात ॥ ३० ॥

क्रियाशक्तिर्ज्ञानशक्तिरिच्छाशक्तिस्तथैव च ॥
आदिशक्तिः परा शक्तिः शक्तिः पंचविधा स्मृता ।३१।

क्रियाशक्ति, ज्ञानशक्ति, इच्छाशक्ति, आदिशक्ति आणि पराशक्ति अशा पांच प्रकारच्या शक्ति सांगितल्या आहेत ॥ ३१ ॥

क्षरं चैवाक्षरं चैव कूटस्थं चात्मनिर्णयः ॥
क्षेत्रज्ञं पंचमं प्रोक्तं विचारः पंच निर्णयः ॥ ३२ ॥

क्षर, अक्षर, कूटस्थ, आत्मनिर्णय आणि क्षत्रज्ञ असे पंचविचार सांगितले आहेत ॥ ३२ ॥

वडवाग्निश्च मंदाग्निरुदराग्निस्तथैव च ॥
शोकाग्निश्चाथ कामाग्निर्ब्रह्माग्निः पंचकं स्मृतम् ।३३।

वडवाग्नि, मंदाग्नि, उदराग्नि, शोकाग्नि आणि ब्रह्माग्नि हे पंचाग्नि जरी सांगितले आहेत तरी ह्यांतील उदराग्नीलाच ब्रह्माग्नि समजून कामाग्नि या नांवाचा पांचवा अग्नि कोणी कोणी मानितात ॥ ३३ ॥

विषययोगानंदौ द्वावद्वैतानन्द एव च ॥
विदेहानन्दो विख्यातो ब्रह्मानन्दश्च पंचमः ॥ ३४ ॥

विषयानंद, योगानंद, अद्वैतानंद, विदेहनंद व प्रख्यात

असा पांचवा ब्रह्मानंद सांगितला आहे ॥ ३४ ॥

नामांतदीक्षा परमार्थनिष्ठा अहं च सोहं च तत-
श्च कोहं ॥ शिवोऽहमस्मीत्यशिवं विचिंत्य अना-
मकोऽहं परिपूर्णगुह्यः ॥ ३५ ॥

प्रथम नामांत दीक्षा जाणून नंतर सोहं ( मी ) आणि कोहं ( परमात्मा तो मीच ) यांची परीक्षा करून मी ह्मणजे काय तें जाणावें. शिव मीच आहें असें चिंतन करून, मी नामरूप शून्य, परिपूर्ण व गुह्य आहे हें विसरूं नये ॥ ३५ ॥

एणेंप्रमाणें पद्मपुराणांतील कपिलगीतेचा
पस्तीस श्लोकांचा दुसरा अध्याय
येथें संपूर्ण झाला.

---

# अध्याय तिसरा.

---

## पार्वत्युवाच ।

मृत्युकाले जगन्नाथ काशीपुर्यां हि प्राणिनाम् ॥
उपदेशः कथं तेषां तन्मे ब्रूहि महेश्वर ॥ १ ॥

पार्वती ह्मणतेः—काशीपुरींत मृत्युसमयीं हे जगन्नाथा तूं प्राण्यांनां उपदेश करितोस, पण त्यामुळें ते मुक्त कसे, होतात ? ॥ १ ॥

## ईश्वर उवाच ।

ॐकारं बिंदुसंयुक्तं नित्यं ध्यायन्ति योगिनः ॥
अस्मिन्मध्ये स्थितं तत्त्वं गुरवो दर्शयन्ति तत् ॥२॥

ईश्वर ह्मणतातः—ज्या बिंदुयुक्त ॐकाराचें ध्यान योगीजन सदोदित करतात त्यांतच तें तत्व राहिलेलें

आहे. त्याचें दर्शन गुरु करवितात ॥ २ ॥

ओमित्येव परं ब्रह्म सर्वं तत्त्वानुग्राहकम् ॥
आब्रह्मस्तम्बपर्यन्तं सर्वानुग्रहकारणम् ॥ ३ ॥

ॐ हेंच परब्रह्म आहे. तेंच सर्व तत्वांवर अनुग्रह करणारें आहे. तेंच आब्रह्मस्तंबपर्यंत जेवढ्या ह्मणून वस्तु आहेत त्या सर्वांवर अनुग्रह करतें ॥ ३ ॥

प्रथमं तारकं ब्रह्म द्वितीयं दण्डब्रह्मकम् ॥
तृतीयं कुण्डलं ब्रह्म चतुर्थं ब्रह्म चन्द्रकम् ॥ ४ ॥

पहिलें ब्रह्मतारक, दुसरें दंडब्रह्म, तिसरें कुंडलब्रह्म आणि चवथें चंद्रकब्रह्म होय ॥ ४ ॥

पंचमं बिंदुब्रह्माथ प्रणवे ब्रह्म पंचकम् ॥
वेदगर्भसमुद्भूतं तदेव यन्निरंजनम् ॥ ५ ॥

पांचवें बिंदुब्रह्म, हीं पांच ब्रह्में प्रणवांत स्थिर असून

जें निरंजन ब्रह्म तें वेदगर्भापासुन उपन्न झालें आहे ॥ ५ ॥

तारकं च भवेद्ब्रह्मा दण्डकं विष्णुरुच्यते ॥
कुंडलयं हि तथा रुद्रो अर्धचन्द्रः स ईश्वरः ॥ ६ ॥

तारकब्रह्म ब्रह्मा, दंडकब्रह्म विष्णु, कुंडलब्रह्म, रुद्र आणि अर्धचंद्रब्रह्म ईश्वर होय ॥ ६ ॥

बिंदुः सदाशिवः साक्षात् प्रणवे पंच देवताः ॥
निरञ्जनस्तदातीत उत्पत्तिस्थितिकारणम् ॥ ७ ॥

ॐकारावरील बिंदु हा साक्षात् सदाशिव असून याप्रमाणें प्रणवांत देवपंचायतन आहे. सृष्टीची—उत्पत्ति, स्थिति करणारा जो निरंजन परमात्मा तो या पांच देवतांहून व त्यांच्या ठिकाणाहून अगदीं निराळा व विलक्षण आहे ॥ ७ ॥

ब्रह्मा त्रिकूटस्थानस्थो ह्यकाराक्षरसंज्ञितः ॥

वाग्वैखरी ह्यवस्था तु जागृतिः स्थूलदेहकम् ॥ ८ ॥

ब्रह्मा त्रिकुटस्थ असून अकाराक्षर हें त्यांचें नांव आहे याची वाणी वैखरी असून अवस्था जागृति आणि देह स्थूल आहे ॥ ८ ॥

र्‍हस्वमात्रा हि ऋग्वेदो रजोगुणः प्रकीर्तितः ॥
एतत्तारकं विज्ञेयं रक्तपंकजमध्यगम् ॥ ९ ॥

त्याची र्‍हस्व मात्रा ऋग्वेद असुन रजोगुण ह्मणून वर्णन केलेलें आहे. तारक ब्रह्म ( उदरस्थ ) रक्तकमलाच्य मध्यभागीं असतें ॥ ९ ॥

विष्णोस्तु श्रीहटस्थानमुकाराक्षरसंज्ञितम् ॥
दीर्घमात्रा मध्यमा च लिंगदेहस्तथैव च ॥ १० ॥

विष्णूचें स्थान श्रीहट हें असून त्याची उकाराक्षर संज्ञा आहे. याची मात्रा दीर्घ असून वाणी मध्यमा व लिंगदेह आहे १०

स्वप्नावस्था यजुर्वेदो गुणः सत्वं प्रकीर्तितः ॥
एतद्दण्डकं विज्ञेयं श्वेतपंकजमध्यगम् ॥ ११ ॥

त्याची अवस्था स्वप्न ही असून देह यजुर्वेद आणि गुण सत्व आहे. ह्या दंडक ब्रह्माचें स्थान ( उदरस्थ श्वेतकमळाच्या मध्यमार्गी आहे ॥ ११ ॥

रुद्रस्य स्थानं गोल्हाटं मकाराक्षरसंज्ञितम् ॥
प्लुतमात्रा हि वक्तव्या तमोगुणः प्रकीर्तितः ॥१२॥

गोल्हाट हें रुद्राचें ठिकाण असून त्याला मकाराक्षर ह्मणतात. त्याची मात्रा प्लुत असून तमोगुणाबद्दल प्रसिद्धी आहे ॥ १२ ॥

कारणं देहकं प्रोक्तं पश्यंती वाक् प्रतिष्ठिता ॥
सुषुप्त्यवस्थया युक्तः सामवेदस्तथैव च ॥१३॥

त्याचा देह कारण आहे, त्याची वाणी पश्यती आहे

आणि अवस्था सुषुप्ती व सामवेद हीं आहेत ॥ १३ ॥

एतवत्कुण्डलयं विज्ञेयं श्यामपंकजमध्यगम् ॥
सोमेश्वरस्य स्थानं च औठपीठेति निश्चितं ॥१४॥

हें ब्रह्म कुंडल्य असून तें ( उदरस्थ ) श्यामवर्ण कमळांत असतें. तें निश्चयानें औटपीट या नांवाचें सोमेश्वराचें स्थान आहे ॥ १४ ॥

पुण्यगिर्यर्द्धमात्रा च परा वाचा सदैव हि ॥
तुर्यावस्था तथा देहं महाकारणमुच्यते ॥१५॥

पुण्यगिरिस्थान अर्धमात्रा, वाणी परा, अवस्था तुर्या आणि महाकारण देह आहे ॥ १५ ॥

अथर्वणवेदयुक्तं दैवतं चेश्वरो महत् ॥
अर्धचंद्रमिदं प्रोक्तं नीलं सुनीलपंकजम् ॥१६ ॥

अथर्वणवेद व ईश्वर हें मोठें दैवत यांनीं उपलक्षित

असलेलें अर्धचंद्रक ( उदरस्थ ) नीलकमलांत नीलवर्णांत स्थिर असतें ॥ १६ ॥

सदाशिवस्य स्थानं तु भ्रमरीगुंफकाभिधम् ॥
परात्परः सूक्ष्मवेदः कैवल्यं ज्ञानदेहकम् ॥१७॥

भ्रमरीगुंफका नांवाचें स्थान सदाशिवाचें स्थान असून परात्पर सूक्ष्म वेद हा त्याचा वेद आणि कैवल्य हा त्याचा ज्ञान देह आहे ॥ १७ ॥

एतद्बिन्दुरिति प्रोक्तं पीतपंकजमध्यगम् ॥
तारकं च भवेद्भूमिर्दण्डकं जलमुच्यते ॥ १८ ॥

ह्याला बिंदु असें ह्मटलें असून तें पीतवर्णाच्या कमळांत असतें. तारक ही त्याची भूमि असून दण्डक हें जल आहे ॥ १८ ॥

कुण्डलधं च तथा तेजो ह्यधचन्द्रं च मारुतः ॥

बिन्दुश्चैव तथाऽऽकाशः प्रणवः पंचभूतभृत् ॥१९॥

त्याचें तेज कुंडल्य, अर्धचंद्रवायु आणि बिंदु हें आकाश आहे. याप्रमाणें प्रणव हा पंचमहाभूतांनां धारण करणारा आहे ॥ १९ ॥

मृत्युस्थितिप्रसर्गित्वं सूर्यचन्द्रात्मतेजसा ॥
तारकं च भवेत्पूर्वे दंडकं पश्चिमे तथा ॥ २० ॥

सूर्यचंद्ररूप तेजाच्या योगानें तें—उत्पात्ति, स्थिती आणि लय यांचें कारण होऊन पूर्वेस तारक आणि पश्चिमेस दंडक असतें ॥ २० ॥

कुण्डल्यं दक्षिणे भागे अर्धचन्द्रं तथोत्तरे ॥
बिन्दुरूर्ध्वदिशि प्रोक्तः प्रणवे पंच वै दिशः ॥२१॥

कुंडल्य दक्षिणेकडे असून उत्तरेकडे अर्धचंद्र आणि बिंदु उर्ध्व दिशेला असतो. याप्रमाणें प्रणवांत पांच दिशा असतात ॥ २१ ॥

एवं देवं हि चात्मानं विज्ञाता स विचक्षणः ॥
नैर्ऋत्यं तारकाकारमीशान्यं दण्डकस्तथा ॥ २२ ॥

या प्रमाणें देवाला व आत्म्याला जाणणारा पुरुष फारच विचक्षण होय. नैर्ऋत्य दिशा तारकाकारक असून ईशान्य दिशा दंडक आहे ॥ २२ ॥

कुण्डलयमग्निदिक्चैव वायव्यमर्धचन्द्रकम् ॥
बिन्दुश्चाधो दिशा प्रोक्ता प्रणवे पंच वै दिशः॥२३॥

आग्नेय दिशा कुंडलय असून वायव्य अर्धचंद्र आहे आणि अधरदिशा बिंदुमय आहे. याप्रमाणें प्रणवांत राहिलेल्या पांच दिशांचा अंतर्भाव ही होतो ॥ २३ ॥

सर्वाकारामिहोच्येत सर्वगं सर्वतोमुखम् ॥
तारकं सद्योजाताय वामदेवाय दण्डकम् ॥ २४ ॥

हा ॐकार सर्वाकार, सर्वगामी आणि सर्वतोमुख

असून, तारक हेंच त्याचें समोजात मुख आणि दंडक वामदेव आहे ॥ २४ ॥

कुण्डल्यं तत्पुरुषाय ईशानायार्धचन्द्रकम् ॥
अघोरेभ्यो बिन्दुरिति प्रणवे मुखपञ्चकम् ॥ २५ ॥

कुंडल्य तत्पुरुष अर्धचंद्र ईशान आणि बिंदु हें अघोमुख होय. याप्रमाणें प्रणवाचीं पांच मुखें आहेत ॥ २५ ॥

विश्वावस्थां समाहृत्य विश्वभोगपरायणः ॥
तारकं चैव ऋग्वेदो यजुर्वेदो हि दण्डकम् ॥ २६ ॥

विश्वावस्था व्यापून, तो सर्व भोग भोगतो. तारक हाच ऋग्वेद असून, दंडक यजुर्वेद आहे ॥ २६ ॥

कुण्डल्यं सामवेदोऽयमर्धचन्द्रो ह्यथर्वणः ॥
बिन्दुश्च सूक्ष्मवेदोऽयं प्रणवो वेदबीजकम् ॥ २७ ॥

कुंडल्य सामवेद, अर्धचंद्र अथर्वण वेद, बिंदु सूक्ष्म वेद आणि प्रणव हा वेदबीज होय ॥ २७ ॥

क्षरं च अक्षरो देवः कूटस्थात्मा च क्षत्रवित् ॥
अधः शून्यं तारकं च ऊर्ध्वशून्यं च दण्डकम् ॥ २८ ॥

तें क्षराक्षराला व्यापणारें कूटस्थ बीजच क्षेत्रज्ञ होय खालील शून्य आहे. तारक असून वरील शून्य दंडक होय ॥ २८ ॥

कुण्डल्यं मध्यशून्यं च सर्वशून्यार्धचन्द्रकम् ॥
बिन्दुश्चैव महाशून्यं प्रणवो विश्वतोमुखः ॥ २९ ॥

मधलें शून्य कुंडल्य असून सर्वशून्य अर्धचंद्रक आहे आणि बिंदु हें महाशून्य आहे. याप्रमाणें प्रणव विश्वतोमुख आहे ॥ २७ ॥

शून्यातीतः परात्परो अक्षरं ब्रह्म उच्यते ॥
प्रणवः पररूपोऽयं कारणं ब्रह्मधारणम् ॥ ३० ॥

शून्यांतील प्रणवाला परात्पर व अक्षर ब्रह्म ह्मणत

प्रणव पररूप असून ब्रह्माचा साक्षात्काराचा आधार आहे व ब्रह्मरूपानें सर्वांचें कारण आहे ॥ ३० ॥

एवं ब्रह्मात्मसंकाशं वर्धयेज्जगदुद्भवम् ॥
प्रथमं तारकं ब्रह्म द्वितीयं दण्डरूपकम् ॥ ३१ ॥

या प्रमाणें हें ब्रह्म सर्व जगाला उत्पन्न करितें पहिलें ब्रह्म तारक असून दुसरें दंडक आहे ॥ ३१ ॥

तृतीयं कुण्डलाकारं चतुर्थमर्धचन्द्रकम् ॥
पंचमं बिन्दुसंकाशं प्रणवः शून्यरूपकम् ॥ ३२ ॥

तिसरें कुंडलाकार असून चवथें अर्धचंद्रक आहे व पांचवें बिंदुरूप आहे. स्वतः प्रणव तर शून्यरूप आहे ॥ ३२ ॥

अव्ययं चाद्भुतं ब्रह्म सहजाव्यक्तरूपकम् ॥
अव्यक्तोद्भवमाकाशमाकाशान्मारुतस्तथा ॥ ३३ ॥

असें हे जें अव्यय, अद्भुत आणि सहजाव्यक्तरूपब्रह्म त्यापासून आकाश उत्पन्न होऊन, आकाश वातोत्पत्ति होते ॥ ३६ ॥

मारुताज्जायते तेजस्तेजसापस्तथैव च ॥
अद्भ्यश्च जायते पृथ्वी पृथ्व्या विश्वं च जायते॥३४॥

वायुपासून तेज आणि तेजापासून पाण्याची उत्पत्ति होऊन, पाण्यापासून पृथ्वी व पृथ्वीपासून सर्व भूतमात्रांची उत्पत्ति होते असें जाणावें ॥ ३४ ॥

विश्वगं ब्रह्म ज्ञातव्यं क्षराक्षरमनामयं ॥
एवं ब्रह्म जगद्व्याप्तं न ज्ञातं पशुमानवैः ॥ ३५ ॥

याप्रमाणें तें क्षराक्षररूप ब्रह्म विश्वव्यापी व निरुपद्रव असून, त्याचें ज्ञान पशुतुल्य मानवांसही होत नाहीं ॥ ३५ ॥

सुज्ञातं सर्वमाचार्यैः सबाह्याभ्यन्तरोदितम् ॥
दृश्यनाशे परं ब्रह्म चाखण्डमव्ययं स्थितम् ॥३६॥

आजपर्यंत होऊन गेलेले व सध्यांही जे आचार्यपदारूढ होऊन बसले आहेत अशा आचार्यश्रेष्ठांनांच तें सबाह्याभ्यंतर असलेलें तत्त्व—दृश्याच नाश झाला म्हणजे अखंड व अव्यय परब्रह्म अवशिष्ट रहातें, हें पूर्णपणें समजलेलें असतें ॥ ३६ ॥

एवं ते दीक्षिता लोकाः सर्वसंदेहवर्जिताः ॥
दीक्षया ब्रह्मरूपाश्च तत्त्वज्ञास्ते व्यवस्थिताः ॥३७॥

अशा त्या आचार्यास शरण जाऊन त्याची दीक्षा घेतली असतां सर्व संदेहांचा नाश होऊन ते स्वतः ब्रह्मरूप व तत्त्वज्ञ होतात ॥ ३७ ॥

पार्वत्युवाच ।

कथं मात्राः कथं देवः कथं वर्णा वद प्रभो ॥
पृथक्पृथङ्मातृकायां के के वर्णाः प्रतिष्ठिताः ॥३८॥

पार्वती ह्मणतेः—प्रभो, मात्रा कोठें व कशा असतात, देव आणि वर्ण कोठें असतात व निरनिराळ्या मात्रांत वर्ण कसे आहेत तें आतां मला सांगा ॥ ३८ ॥

ईश्वर उवाच ।

तारकं मूलभूतं स्यादकाराख्या च मातृका ॥
ब्रह्मा तु दैवतं प्रोक्तं रक्तवर्णविराजितम् ॥ ३९ ॥

ईश्वर ह्मणतातः—तारक मूळभूत असून त्याची मात्रा अकारात्मक आहे ॥ ३९ ॥

पृथग्वर्णं तथा देवि रक्तपीतं सुशोभितम् ॥
त्रयं सार्धं स्वहस्तानां प्रमाणं दृहलक्षणम् ॥ ४० ॥

हे देवी, रक्तपीत हा त्याचा स्वतंत्र वर्ण असून, तो फार सुशोभित आहे व प्रत्येकाच्या हातानें साडेतीन हात हे प्रत्येकाच्या देहाचें प्रमाण आहे ॥ ४० ॥

द्वितीयं दण्डकं ज्ञेयमुकाराख्या च मातृका ॥
विष्णुर्दैवतमाख्यातं श्वेतवर्णविराजितम् ॥ ४१ ॥

दुसरें हें दंडक ब्रह्म त्याची मात्रा उकार संज्ञक असून दैवत विष्णु आहे आणि तें शुभ्रवर्णानें सुशोभित आहे ॥ ४१ ॥

पृथग्वर्णं तथा देवि श्वेतकर्बुरराजितम् ॥
अंगुष्ठपर्वहस्तं च प्रमाणं देहलक्षणम् ॥ ४२ ॥

देवी, त्याची पृथग्वर्ण शुभ्र व चित्रविचित्र असून, तें त्या वर्णानें शोभित आहे व त्याच्या देहाचें प्रमाण हस्तांगुष्टाच्या पेरा एवढें आहे. ॥ ४२ ॥

तृतीयं चैव कुण्डल्य रुकाराख्या च मातृका ॥
रुद्रो दैवतमाख्यातं श्यामवर्णविराजितम् ॥ ४३ ॥

तिसरें जें कुंडल्य ब्रह्म त्याची मात्रा मकार असून दैवत रुद्र आहे व तें श्यामवर्णानें शोभलेलें आहे ॥ ४३ ॥

पृथग्वर्णपंचकं च राजत्येषां च भौतिकम् ॥
ते वर्णाः श्यामगर्भस्था ज्ञातव्याश्च मनीषिभिः ॥४४॥

त्याचे भौतिक पांच निराळे वर्ण असून ते नेहमीं झळकत असतात. ते वर्ण श्यामवर्णांत स्थित असून त्याचा विवेक ज्ञाते ज्ञानाच्या योगानें करितात ॥ ४४ ॥

पर्वार्धं च स्वहस्तस्य प्रमाणं देहलक्षणम् ॥
चतुर्थमर्धचन्द्रं च ईकाराख्या च मातृका ॥ ४५ ॥

आपल्या हातांच्या बोटाचें अर्धें पेर हें त्याचें देहप्रमाण असून, चवथें जें अर्धचंद्रब्रह्म त्याची मात्रा इकार हो

आहे ॥ ४५ ॥

ईश्वरो दैवतं प्रोक्तं नीलवर्णविराजितम् ॥
पृथग्वर्णद्वयं चैव नीलं सुनीलकं तथा ॥ ४६ ॥

त्याचें दैवत ईश्वर असून तें नीलवर्णानें शोभलेलें आहे व त्याचे नील आणि सुनील असे दोन निराळे रंग आहेत ॥ ४६ ॥

पीतं तृतीयो वर्णस्तु शुद्धश्वेतश्चतुर्थकः ॥
नीलगर्भस्य मध्यस्थं वर्णत्रयमुदाहृतम् ॥ ४७ ॥

त्यांतील पीत हा तिसरा वर्ण असून शुद्ध श्वेत हाही चवथा वर्ण तेथें असतो—असें जरी आहे तरीं, वरील तिन्ही वर्ण नीलवर्णाच्या मध्यभागीं असतातच ॥ ४७ ॥

मसुरामात्रप्रमाणं शोभितं देहलक्षणम् ॥
पंचमं बिन्दुसंकाशमेकाराख्या च मातृका ॥ ४८ ॥

त्याचें देहलक्षण मसुराप्रमाणमात्र असून पांचवें ब्रह्म बिंदुरूप आहे व त्याची मात्रा एकार आहे ॥ ४८ ॥

देवः सदाशिवो ज्ञेयः पीतवर्णो ह्यनुक्रमात् ॥
पृथग्वर्णस्तु नैवात्र शुद्धस्फाटिकदीपवत् ॥ ४९ ॥

त्याचें दैवत सदाशिव असून, त्याचा स्वाभाविक वर्ण पीत हा आहे व त्यामध्यें निराळा असा मुळींच नसून तें शुद्ध स्फटिक कांतीप्रमाणें आहे ॥ ४९ ॥

प्रमाणं न भवत्यो कैवल्यज्ञानदेहके ॥ ५० ॥

त्याचा देह साक्षी चैतन्यरूप असल्यामुळें त्या कैवल्य ज्ञान देहाला प्रमाणच नाहीं ॥ ५० ॥

इदं सर्वशिरः पीतशिखं केवलराजितं ॥
पीतः शिखाबिंदुरत्र ब्रह्मसायुज्यकारकः ।५१।

हें सर्व श्रेष्ठ ब्रह्म पीतवर्णाच्या शिखरें भूषित असून,

ब्रह्मसायुज्य देणारा जो पीतवर्ण शिखा बिंदु तो यांत झळकत असतो ॥ ५१ ॥

बिंदुगर्भस्य मध्यस्थं शुद्धश्वेतं सुलक्षणं ॥
सोऽहं मात्रा मुख्यबीजं सर्वांतर्गर्भचारि यत् ॥५२॥

त्या बिंदुच्या मध्यभागीं—शुद्ध, श्वेत, सुलक्षण आणि सर्वांत अंतर्गर्भांत असणारें ' सोऽहं हें मुख्य बीज असतें ॥ ५२ ॥

सोऽहंबीजस्य मध्यस्थः श्रीरामः परमो महान् ॥
सोऽहं राम इदं ज्ञात्वा अत ऊर्ध्वं न किंचन ॥५३॥

या ' सोऽहं ' बीजाच्या मध्यभागीं परम आणि महान् आत्मा जो श्रीराम तो असून, तोच मी हें सर्व चराचर नाहें असें जाणल्यावर शिल्लक कांहींच रहात नाहीं ।५३॥

पार्वत्युवाच ।

सोऽहं तारकब्रह्मैव राममंत्रं वद प्रभो ॥
एतच्छ्रवणमात्रेण कृतकृत्याऽस्मि सर्वदा ॥५४॥

पार्वती ह्मणतेः—'सोऽहं' हेंच तारक ब्रह्म 'राममंत्र' आहे तर तो आतां मला सांग। ह्मणजे त्याच्या श्रवणानेंच मी नेहमीं कृतकृत्य होईन ॥ ९४ ॥

ईश्वर उवाच ।

न देयं यस्य कस्यापि प्राणाः कंठगता यदि ॥
देयं सद्भक्तियुक्ताय शांताय समचेतसे ॥ ५५ ॥

ईश्वर ह्मणतातः—हा मंत्र प्राण जाण्याची वेळ आली-तरी वाटेल त्याला देऊं नकोस तर फक्त–सद्भक्तियुक्त, शांत आणि सर्वभूतीं समान दृष्टि ठेवणारा जो असेल त्यालाच दे ॥ ९५ ॥

गुरुभक्तिरता नित्यं विरक्तो यः समाहितः ॥
भक्तिर्ज्ञानं विरक्तिश्च हृदि तिष्ठेत्सनातनी ॥५६॥

नेहमीं गुरुभक्तिरत, विरक्त समाहितचित्त असा जो असतो त्याच्याच हृदयांत—भक्ति, ज्ञान आणि विरक्ति हीं नेहमीं रहातात ॥ ५६ ॥

तस्मै देयं च देवेशि अन्यथा न प्रकाशयेत् ॥
प्रकाशितं च दुष्टेऽपि निष्फलं जायते ध्रुवं॥५७॥

ह्मणून हे देवि, अशास हा मंत्र द्यावा; इतराला देऊं ये. कारण, अनधिकाऱ्याला जर दिला तर तो खात्रीनें निष्फल होतो ॥ ५७ ॥

अथ मंत्रं प्रवक्ष्यामि मोक्षदं सर्वदेहिनां ॥
ॐहंसःसोहं तथा देवि इत्यादौ पाठयेत्सुधीः॥५८॥

आतां, सर्व देह धारण करणाऱ्यांना मोक्ष देणारा

मंत्र तुला सांगतों. 'ॐहंसः सोऽहं' असे हे दोन्हीं, मंत्र घेणाऱ्याकडून म्हणवावे ॥ ५८ ॥

पश्चाच्छ्रीरामरामाय नमश्चैवाभिनिश्चितं ॥
एवं च तारकं ब्रह्म राममंत्रमिति स्मृतं ॥ ५९ ॥

नंतर 'श्रीराम रामायनमः' असा उच्चार करण्यास त्याला सांगावें. याप्रमाणें हा राममंत्र तारक ब्रह्म आहे असें सांगितलें आहे ॥ ५९ ॥

अथ मंत्राधिकारस्तु सर्वस्याऽत्र न संशयः ॥
ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वा ह्यंत्यजोऽपि वा ६०

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अंत्यज या सर्वांस ह्या मंत्रानुग्रहाचा अधिकार आहे यांत संशय नाहीं ॥ ६० ॥

षड्दर्शनादिमार्गेषु ब्राह्मदर्शि तथैवच ॥
वर्णेषु वर्णहीनेषु चांडाळादिषु निश्चितं ॥ ६१ ॥

षड्दर्शनादि मार्गामध्यें ब्राह्मदर्शनच उत्तम होय.
च्या तत्वाचें ज्ञान ब्राह्मणादि उच्चवर्ग किंवा चांडला
वर्ग ही निश्चयानें करून घेतात ॥ ६१ ॥

यस्य देहे वसेच्छ्रद्धा तस्य देयं शुभानने ॥
मंत्रो देयः प्रथमतः क्षेत्रशुद्ध्यै सुनिश्चितं ॥ ६२ ॥

म्हणून हे शुभावने, ज्याच्या हृदयांत श्रद्धा असले
त्याच्या शरीररूपी क्षयाची शुद्धि होण्याकरितां त्याला
प्रथम मंत्र देणें अगदीं निश्चित झालें आहे ॥ ६२ ॥

सप्तकोटिमहामंत्राद्यसंख्या ह्युपमंत्रकाः ॥
एतांश्च सकलान् मंत्रान् न तावच्चेह ब्रुमहे ॥ ६३॥

महामंत्र सात कोटि असून उपमंत्र तर असंख्य आहेत;
तु त्या सर्व मंत्रांचा नुसता नामनिर्देशही आम्ही एथें
णार नाहीं ॥ ६३ ॥

सर्वमंत्राधिकाः श्रेष्ठाः पंचायतनमंत्रकाः ॥
गजाननाधिकतरा सूर्यविद्या विशिष्यते ॥ ६४ ॥

सर्व मंत्रांहून पंचायतन देवतांचे मंत्र श्रेष्ठ होत. त्यांतल्या-त्यांत गणपतीपेक्षां सूर्यविद्या विशेष आहे ॥ ६४ ॥

सूर्यविद्याधिका देवी विष्णुविद्या विशिष्यते ॥
विष्णुविद्याधिका श्रेष्ठा शांभवी शिववल्लभा ॥६५॥

सूर्यविद्येपेक्षां विष्णुविद्या श्रेष्ठ आहे आणि विष्णुविद्येपेक्षां शंकरास प्रिय असलेली शांभविद्या अधिक आहे ६५.

शांभव्या अधिका देवि शक्तिविद्या परा स्मृता ॥
एतच्छ्रेष्ठतरा विद्या एतच्छ्रेष्ठा न विद्यते ॥ ६६ ॥

शांभवी विद्येहूनही शक्तिविद्या श्रेष्ठ आहे, असें, हे देवि, ह्मटलें आहे. या विद्येहून श्रेष्ठ अशी विद्या नाहीं ॥ ६६ ।

सर्वविद्याशिरो ह्यस्माच्छ्रीविद्या हि न संशयः ॥

तस्मात् सा सर्वविद्यानां श्रीविद्या शिरसि प्रिये।६७

प्रिये, ही विद्या सर्व विद्यांचें मस्तक आहे ह्मणूनच तिला श्री विद्या असें ह्मणतात यांत संशय नाहीं. ह्मणून ती विद्या सर्व विद्यांच्या मस्तकावर आरूढ झाली आहे ॥ ६७ ॥

राजराजेश्वरी विद्या एतन्मुख्या न काचन ॥
सत्यं सत्यं पुनः सत्यं सत्यं सत्यं पुनः पुनः॥६८॥

ही राजराजेश्वरी विद्या असून हिच्यापेक्षां मुख्य अशी दुसरी कोणचीच विद्या नाहीं हें मी सत्य सत्य असें अगदीं सत्य ह्मणून पुनः पुनः सांगतों ॥ ६८ ॥

सत्यं सत्यं पुनः सत्यं त्रिर्वाचा कथयाम्यहं ॥
अस्याधिका सर्वरिता एतस्मिन् कथिता तव ॥ ६९ ॥

हें सत्य सत्य पुन्हा सत्य असें त्रिवार मी सांगतों

आहे हिच्या माहिम्यापेक्षां दुसऱ्या कोणच्याही विद्येचा महिमा अधिक नाहीं ॥ ६९ ॥

एतदूर्ध्वं न कस्यापि निश्चितं कथितं शिवे ॥
भाष्यं मे हि पुनर्भाष्यं निश्चयेन ब्रवीम्यहं ॥७०॥

हे शिवे, ह्याहून अधिक निश्चित असें मीं कधींच कोणाला सांगितलेलें नाहीं. हें माझें प्रमाणभूत भाष्य आहे पुन्हां मी तुला निश्चयानें सांगतों कीं हें माझें भाष्य आहे ॥ ७० ॥

अस्य मंत्रस्य देवेशि नैव न्यासः षडंगकः ॥
नैव ध्यानं भूतशुद्धिर्न च प्राणप्रतिष्ठितिः॥७१॥

हे देवेशि, ह्या मंत्राच्या जपारंभापूर्वीं षडंगन्यास ध्यान-धारणा, भूतशुद्धि, प्राणप्रतिष्ठा, वगैरे कशाचीही जरूर लागत नाहीं ॥ ७१ ॥

कवचं च न च स्तोत्रं न च दिग्बंधनादिकं ॥
सिद्धसाध्यसुसिद्धारिघटितार्थं न किंचन ॥७२॥

कवच, स्तोत्र, दिग्बंधन, सिद्ध, साध्य, सुसिद्ध, अरि-टितार्थ वगैरे करण्याचें कांहीं कारण नाहीं ॥ ७२ ॥

न यंत्रपूजनं चैव पद्धत्या पटलादिकं ॥
सहस्रनामजप्यादि स्तवराजादिकं न च ॥ ७३ ॥

पद्धतीशीर यंत्रपूजा, पटल, सहस्रनाम, स्तवराज हीं :द्धां नकोत ॥ ७३ ॥

न होमो न क्रिया यस्य धनर्णादि तथा न हि ॥
तस्माद्घटितार्थमंत्रमुक्तत्वं सर्वदा प्रिये ॥ ७४ ॥

होमहवन, क्रिया धनऋण वगैरे कांहीं नाहीं. म्हणून ये, ह्या मंत्रपठणानें सर्व मुक्त होतात ॥ ७४ ॥

अतःपरं निरूपणं नास्ति कदाचन ॥

संपूर्णो हि प्रिये राम आत्मारामो हि मे हृदि ॥७५॥

प्रिये, आतां या बाबतींत निरूपण करण्याचें कांहींच राहिलें नाहीं, खरोखरच कांहीं राहिलें नाहीं. संपूर्ण आत्माराम माझ्या हृदयांत स्थित आहे ॥ ७५ ॥

पंचाक्षरं जपेत्पूर्वं मध्ये रामपदं जीवरूपिणे ॥
अंते पंचाक्षरं जप्त्वा शिवेन समतां व्रजेत्॥ ७६ ॥

प्रथम 'हंसःसोऽहं' हा पंचाक्षरी मंत्र उच्चारून मध्यें रामपदाचें, 'श्रीराम' स्मरण करावें आणि शेवटीं 'रामायणमः' हीं पांच अक्षरें उच्चारावीं, ह्मणजे जप करणारा शिवाच्या समतेला प्राप्त होतो ॥ ७६ ॥

तत्पदं शिवरूपाय त्वंपदं जीवरूपिणे ॥
असीत्येतत्तु रामाय त्रयस्यैक्यं न संशयः॥ ७७ ॥

'तत्पद' शिवरूप असून 'त्वंपद' जीवरूप आहे आणि 'असि' हें पद रामसंज्ञक असल्यामुळें या तिन्ही पदांचा ऐक्य असा अर्थ होतो यांत संशय नाहीं ॥७७॥

एकेऽपि हेमकर्तारो जीर्णकायं पुनर्नवं ॥
ऋद्धि सिद्धि प्रदातारो ब्रह्मज्ञान न विशेषतः ॥७८॥

कित्येक किमया करतात, कित्येक नवे देह संपादन करतात, कित्येक ऋद्धिसिद्धि प्राप्त करून घेतात पण प्रायः कोणी ब्रह्मज्ञ होतें नाहीं ॥ ७८ ॥

दिव्यौषधीरसरसायणधातुवादे ॥
होरावशीकरणगारुडथन्यवादे ॥
ताले च खड्गगुटिकाजलमंत्रवादे ॥
सिध्यंति ते हरिशिवौ च च यदि प्रसन्नौ ॥ ७९ ॥

कोणी दिव्य औषधि मिळवितात, कोणी रसायनधातुवाद शिकतात, कोणी होरा, वशीकरण, गारूड, ताळ खड्ग, गुटिका, जलमंत्रवाद वगैरे हरिहरांच्या प्रसन्नतेनें प्राप्त करून घेतात ॥ ७९ ॥

कलाचतुष्टये युक्तं शिवं साक्षान्न संशयः ॥
ज्ञात्वा गुरुमुखाद्ब्रह्म ब्रह्मैवाऽहं न संशयः ॥८०॥

परंतु आत्मतत्वाकडे कोणाची प्रवृत्ति होत नाहीं. म्हणून गुरुमुखानें या मंत्राची दीक्षा घेऊन मीच ब्रह्म आहें यांत संशय नाहीं असा निश्चय करावा ॥ ८० ॥

येथें कपिलगीतेचा तिसरा अध्याय
समाप्त झाला.

# अध्याय चवथा.

पार्वत्युवाच ।

विहंगो वाहनं यस्य त्रिकचा यस्य भूषणं ॥
सालपा वामभागस्था स देवः शरणं मम ॥ १ ॥

पार्वती म्हणतेः—ज्याचें वाहन गरुड आहे, ज्याचें भूषण कौस्तुभ आहे आणि ज्याच्या वामभागीं श्रीलक्ष्मी आहे तो देव माझा रक्षक आहे ॥ १ ॥

परीक्षिच्छ्रवणं चक्रे कीर्तनं नारदः शुकः ॥
स्मरणं शिवप्रल्हादौ लक्ष्मीश्च पादसेवनं ॥ २ ॥

परीक्षितीनें जसें ऐकलें, नारद व शुक यांनीं जसें कीर्तन केलें, शिव आणि प्रल्हाद यांनीं जसें स्मरण केलें, लक्ष्मीनें जसें पादसेवन केलें ॥ २ ॥

अर्चनं पूजनं ध्यानं पृथुराजादिभिः कृतं ॥
वंदनं तूद्धवाक्रुरौ दास्यं ताक्ष्यंहनूमतौ ॥ ३ ॥

पृथुराजादिकांनीं जसें पूजन-अर्चन व ध्यान केलें, उद्धव आणि अक्रूर यांनीं जसें वंदन केलें आणि गरुड व हनुमान यांनीं दास्य केलें ॥ ३ ॥

सख्यमर्जुनकर्तव्यं बलेश्चात्मनिवेदनं ॥
भक्ति नवविधां कृत्वा कैवल्यं प्राप्यते परं ॥ ४ ॥

अर्जुनानें जसें सख्यकेलें व बलीनें ज्याप्रमाणें आत्मनिवेदन केलें त्याप्रमाणें नवविधा भक्ति केली असतां, परमकैवल्य प्राप्त होतें ॥ ४ ॥

श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ॥
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनं ॥ ५ ॥

एणेंप्रमाणें-श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन,

वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदभक्ति नऊप्रकारची विष्णूची भक्ति आहे ॥ ५ ॥

वेदांतन्यायमीमांसातर्कन्यायादिकं तथा ॥
चार्वाकादीनि शास्त्राणि षड्दर्शनमपि स्मृतं ॥ ६ ॥

वेदांत, न्याय, मीमांसा, तर्कन्यायादिक हीं सहा दर्शनें व चार्वाकादिक आहेत ॥ ६ ॥

कापालिकश्च जैनश्च जंगमो ब्राह्मणस्तथा ॥
संन्यासी च तथा लोपिऽषड्दर्शनधराः स्मृता ॥ ७ ॥

कापालिक, जैन, जंगम, ब्राह्मण, संन्यासी, चार्वाक इत्यादि त्या दर्शनांचे प्रवर्तक होत. ॥ ७ ॥

शैवाः शाक्तास्तथा सौरा गाणपत्यास्तथैवच ॥
जैनाश्च वैष्णवाः प्रोक्ताः षड्दर्शनमदाः स्मृताः ॥ ८ ॥

शैव, शाक्त, सौर, गाणपत्य, जैन, वैष्णव इत्यादि

संप्रदाय षड्दर्शनमय आर्हत ॥ ८ ॥

हस्तः पवित्रो यदि दानपुण्यं पादौ पवित्रौ यदि तीर्थयात्रा ॥ वाक्यं पवित्रं यदि रामनाम हृद्वै पवित्रं यदि ब्रह्मनिष्ठा ॥ ९ ॥

दानपुण्यानें हात पवित्र होतात, तीर्थयात्रा केल्या असतां पाय पवित्र होतात, रामनामोच्चारानें वाणीपवित्र आणि ब्रह्मनिष्ठेनें हृदय पवित्र होतें ॥ ९ ॥

ज्ञानं विरागो नियमो यमश्च स्वाध्यायवर्णाश्रमधर्मकर्म ॥ भक्तिः परेशस्य सतां प्रसंगो मोक्षस्य मार्गं प्रवदंति संतः ॥ १० ॥

शास्त्रांचें यथार्थ ज्ञान, विरक्ति, चित्तवृत्तीचें नियमन, जितेंद्रियता, वेदाध्ययन, वर्णाप्रमाणें योग्य असेल तो धर्म आणि कर्म, परमेश्वराच्या ठायीं पूर्ण निष्ठा आणि संतसमा-

गम—ह्या गोष्टी मोक्षाचा मार्ग दाखवतात असें सा
ह्मणतात ॥ १० ॥

शैवाः पाशुपता महाव्रतधराः कालीमुखा जंगमाः।
शाक्ताः कौलकुलार्चनादिनिरताः कापालिकाः
शांभवाः ॥ येऽज्ञाः कृत्रिममंत्रतंत्रनिरतास्ते
तत्त्वतो वंचिताः ॥ तेषामल्पमिहैकमेव हि फलं
सत्यं न मोक्षः परः ॥ ११ ॥

शैव, महाव्रतें आचरणारे पाशुपत, कालीमुख, जंगम,
देवीउपासक, कुलार्चनांत दंग असलेले कौल, कापालिक
शांभव आणि त्याचप्रमाणें कृत्रिम मंत्रतंत्रांदिकांत रत असलेले अज्ञ, आपल्या अज्ञानानें निव्वळ फसले गेले आहेत
ऐहिक सुखाचेंच त्यांनां अल्पसें फळ मिळतें; परंतु मोक्ष
कधींही प्राप्त होत नाहीं ॥ ११ ॥

चार्वाकाश्चतुराः स्वधर्मनिपुणा देहात्मवादे रताः ॥
नानानर्ककुतर्कभावसहिता निष्ठापरास्तार्किकाः ॥
वेदार्थप्रतिपादकाः सकुशलाः कर्तेति नैय्यायिका-
स्तेषां स्वल्पफलं भवेत्तु सततं सत्यं न मोक्षः परः ।१२।

चतुर चार्वाक, स्वधर्म निपुण असून देह हाच आत्मा असें मानितात; तार्किक अनेक तऱ्हांच्या तर्ककुतर्कांत मग्न असतात; स्वदर्शनावर त्यांची मोठी निष्ठा असते; ते वेदार्थ-प्रतिपादक असतात; असे ते मोठे कुशल नैय्यायिक आत्म्या-लाच कर्ता समजतात त्यामुळें त्यांनां त्यांच्या ज्ञानाचें अगदीं अल्प फळ मिळतें आणि त्यांनां मोक्ष अप्राप्य असा होतो ॥ १२ ॥

कर्माकर्मविकर्मबोधजनकाः कामार्थमीमांसकाः ॥
सांख्यास्त्यागपराः सदा विविदिषा संन्यासिनः

स्नातकाः ॥ योगांगाष्टकबोधकप्रतिभटाः पातं-
जला न्यायका योगज्ञानमिदं प्रबोधजनकं सत्यं
न मोक्षः परः ॥ १३ ॥

कर्ममीमांसक जे असतात ते- कर्म, अकर्म, विकर्म यांचा बोध करितात, सांख्य त्यागपरायण असून ते ते नेहमीं ब्रह्मचर्यव्रतानें विविदिषासंन्या अवलंबितात व पातंजलन्यायांत प्रवीण असलेले योगी अष्टांग योगाच्या प्रतिपादनांत मोठे शूर असतात. हें योगजनक ज्ञान आत्म साक्षात्कारक असें आहे हें खरें; परंतु त्याच्यायोगानें परमोक्षप्राप्ति होत नाहीं ॥ १३ ॥

वेदांती बहुतर्ककर्कशमतिश्चाद्वैतसंबोधको ॥
नानावादविवादिनो न निपुणा विज्ञानबोधात्मकाः॥
कर्तारं प्रवदंति चैव यवनः पापे रता निर्दया ॥

विप्रा वेदरताः समत्वनिरताः सत्यं न मोक्षःपरः १४

वेदांती अनेक तर्क लढवून अद्वैताचें प्रतिपादन करितात परंतु त्यांची मती भ्रष्ट झालेली असते. अनेक तऱ्हेचे वाद करून ते स्वतःला विज्ञानबोधस्वरूप असे मानितात खरे; परंतु ते बोलण्याप्रमाणें निपुण नसतात. पापरत आणि दुष्ट यवन आत्म्यालाच कर्ता असे मानितात. ब्राह्मण वेद-रत आणि समत्वमग्न असतात; परंतु त्यांनांही परमोक्षप्राप्ति होत नाहीं ॥ १४ ॥

शून्यार्थप्रतिपादका लघुगुरोर्बोधाज्जिना श्रावका।
नानातीर्थनिषेवकाः श्रुतिपराः स्मृत्यर्थसंबोधकाः ।
चंडाश्चंडविचंडजल्पकमहाभेदाः सदा वैष्णवाः ॥
सर्वे वै प्रपतंति दुःसहतरे सत्यं न मोक्षः परः ॥१५॥

श्रावक जैन सामान्य गुरूच्यानें उपदेशानें शून्यार्थ-

प्रतिपादक होतात. श्रुतिस्मृतींना प्रमाण मानून त्यांचा अर्थ बोध करणारे ब्राह्मण अनेक तीर्थांचें सेवन करितात. वैष्णव स्वभावतःच नेहमीं जाज्वल्य आणि तीक्ष्ण व उग्र भाषण करणारे असतात; परंतु हे सर्व दुःसह अशा भवसागरांत पडतात आणि त्यामुळें त्यांना मोक्ष अप्राप्त होतो ॥ १५ ॥

प्राणापाननिरोधनार्थनिरताः संस्थाप्यते शेषका
वायुं पूरककुंभकं प्रतिदिनं तं रेचकं वा हठात् ॥
जिव्हादोहनकार्मिकाः सुरसिका लंबायना लंबिका
योगांगैश्च विभूषिताश्च सततं सत्यं न मोक्षःपरः॥१६॥

पातंजल योगाभ्यासी प्राणायान वायूंचा निरोध करण्यांत दंग असलेले योगी बलात्कारानें वायूची संस्थापना करून, पूरक, रेचक व कुंभक करितात व जिभेला तालूंत शिरक-

वून तिला हलविण्याचा प्रयत्न करितात. ते मोठे रसिक असून लंबिकायोगही साधितात. ते यमनियमादि योगांगांनीं जरि भूषित असतात तरी त्यांना मोक्षलाभ होत नाहीं ॥ १६ ॥

यं शैवाः समुपासते शिव इति ब्रह्मेति वेदांतिनो ।
बौद्धा बुद्ध इति प्रमाणपटवः कर्तेति नैय्यायिकाः ॥
अर्हन्नित्यथ जैनशासनरताः कर्मेति मीमांसकाः ।
सोऽयं वो विदधातु वांछितफलं सत्यं न
मोक्षात् परं ॥ १७ ॥

शैव ज्याची शिव या नामाभिधानानें उपासना करितात, जे व वेदांति ब्रह्माचेंच अनुसंधान करितात, बौद्ध ज्याला बुद्ध या नांवानें ओळखतात, प्रमाणकुशल असे नैय्यायिक त्याला कर्ता ह्मणतात, जैन शास्त्ररत ज्याला

अर्हन् ह्मणतात, मीमांसक ज्याला कर्म ह्मणतात तो हा परमात्मा तुह्मां सर्वांना वांच्छित फळ देवो. खरोखर मोक्षाव्यतिरिक्त सत्य असें दुसरें कांहीं नाहीं ॥ १७ ॥

सौराः सूर्यमुपासते च सततं शाक्ताश्च शक्तिं तथा।
नागेशेषु परं गणेशभजनं विष्णुं भजेद्वैष्णवः ॥
शैवानां शिवपूजनं परमकं विप्रे च सर्वात्मकं ।
नानादैवतवांछितार्थवरदं सत्यं न मोक्षात् परं १८

सौर नेहमीं सूर्याची आराधना करितात, शाक्त देवीचें अर्चन करितात, गाणपत्य गणपतीचेंच भजन श्रेष्ठ मानितात, वैष्णव विष्णूचीच भक्ति करितात, शैव शिवपूजनालाच अधिक मानितात आणि सामान्य ब्राह्मण सर्वात्मक अशा परमेश्वराची भक्ति करितो; कारण तो अनेक देवतांना इष्ट असलेले वर देतो; परंतु मोक्षापेक्षां

श्रेष्ठ असें दुसरें कांहीं नाहीं ॥ १८ ॥

नानाचित्रविचित्रवेषशरणा नानामते भ्रामका ॥
नानातीर्थनिषेवका जपपरा मौनस्थिता नित्यशः ॥
सर्वे चोदरसेवकास्त्वभिमता वादे विवादे रता ॥
ज्ञानान्मुक्तिरिदं वदंति मुनयस्त्वप्राप्य सा दुर्लभा॥

चित्रविचित्र असे अनेक वेष धारण करणारे, अनेक मतांत भ्रमण करणारे, अनेक तीर्थांचें सेवन करणारे, जपजाप्यांत निमग्न असणारे, नेहमीं मौन धारण करणारे व वादविवादांत सतत निमग्न असणारे हे सर्व पोटाचे नोकर आहेत असें मानिलेलें आहे. ज्ञानाच्या योगानें मुक्ति प्राप्त होते असें मुनि सांगतात तेव्हां. ज्ञानाशिवाय ती दुर्लभच होय ॥ १९ ॥

ज्ञानमात्रेण मुच्यंते नानासाधनवर्जिताः ॥

साक्षात्कारपरं ज्ञानं प्राप्यते गुरुराजतः ॥ २० ॥

ह्या वर सांगितलेल्या अनेक साधनांनीं युक्त ज्ञानाच्याच योगानें मुक्त होतात. साक्षात्कारपर ज्ञान प्राप्त होण्यास गुरुराजच कारण होतात ॥ २० ॥

शाश्वतानन्दशान्तत्वं पूर्णरूपस्वरूपकं ॥
तुष्टत्वं चाचलत्वं च षडैश्वर्यादि प्राप्यते ॥ २१ ॥

अढळ आनंद, शाश्वत शांति, अखंड सत्ता, पूर्ण आत्मस्वरूप, तुष्टि व अचलत्व ही षडैश्वर्ये प्राप्ति साधकाला ज्ञानाच्याच योगानें होते ॥ २१ ॥

ऋषिसिद्ध उवाच ।

जलस्नानाद्बहिःशुद्धिरंतःशुद्धिः कथं भवेत् ॥
योगिनां च कुतः स्नानं कृपालो कपिलोच्यतांम् २२

ऋषिसिद्ध ह्मणतातः—हे कृपाळु कपिल मुने, अक-

स्नानानें शरीराची बाह्य शुद्धि होते परंतु अंतःशुद्धि कशी होईल ? योग्यांना स्नान कसें घडतें तें सांगा ॥ २२ ॥

## कपिल उवाच ।

वामनासापुटे हीडा पुटे दक्षे च पिंगला ॥
गांधारी वामकर्णे च हस्तिनी दक्षिणे तथा ॥२३॥

कपिल ह्मणतातः—डाव्या नाकपुडींत इडा, उजवींत पिंगला, डाव्या कानांत गांधारी, उजव्यांत हस्तिनी ॥२३॥

सुषुम्ना चांगदा प्रोक्ता जिव्हाग्रे च सरस्वती ॥
वामनेत्रे चक्षुषा तु दक्षिणेऽलंबुषा मता ॥ २४ ।

अंगदा सुषुम्नलाच ह्मणतात, जिव्हाग्रावर सरस्वति डाव्या डोळ्यांत चक्षुषा व उजव्यांत अलंबुषा अशीं हे नाड्यांचीं स्थानें आहेत ॥ २४ ॥

कुहूर्गुदस्था संप्रोक्ता शंखिनी लिंगसंस्थिता ॥

मूत्रद्वारे वारुणी स्यात् सर्वांगे च पयस्विनी ॥२५॥

गुदांत कुहू, लिंगांत शंखिनी, मूत्रद्वारांत वारुणी आणि सर्व देहांत पयस्विनी याप्रमाणें नाड्यांचीं स्थानें आहेत ॥ २५ ॥

नाड्यो द्वादश संप्रोक्ता शरीरे सुव्यवस्थिताः ॥
व्याप्नुवंति दशद्वारं चराचरनियामकाः ॥ २६ ॥

ह्या वर सांगितलेल्या बारा नाड्या शरीरांत आपापल्या जागीं व्यवस्थितपणानें राहून दशद्वारांत फिरत असतात आणि चाराचरांचें नियम करितात ॥ २६ ॥

इडा भागीरथी गंगा पिंगला यमुना नदी ॥
सुषुम्ना गंडकी प्रोक्ता कृष्णावेण्यौ सरस्वती॥२७॥

इडा ही भागीरथी गंगा, पिंगला ही यमुना, सुषुम्ना ही गंडकी आणि कृष्णावेणी ही सरस्वति असें म्हटलें

आहे ॥ २७ ॥

कुहूश्च नर्मदा ज्ञेया तापी स्याच्छंखिनी तथा ॥
गांधारी चापि कावेरी वारुणी गौतमी तथा॥२

कुहु हीच नर्मदा, शंखिनी हीच तापी, गांधारी कावेरी, वारुणी हीच गौतमी ॥ २८ ॥

ताम्रपर्णी सुबानाडी सिंधुर्ज्ञेया च हस्तिनी ॥
गोमत्यलंबुषा चैव पूर्णा पूर्णपयस्विनी ॥ २९ ॥

चक्षुषा हीच ताम्रपर्णी, सिंधु हीच हस्तिनी आ पूर्णपयस्विनी हीच गोमत्यलंबुषा जाणावी ॥ २९ ॥

इति नाडी नदी प्रोक्ता शरीरे वर्तते सदा ॥
पवनं च तुरीयं च सर्वतः स्नानमुच्यते ॥ ३० ।

एणें प्रमाणें नाड्यांच्या ठिकाणीं नद्यांची कल्प करावी आणि त्या नद्या आपल्या शरीरांत आहेत

समजावें. योगमार्गानें जाऊं लागलें असतां आत्म्याचें तुर्य—साक्षिस्वरूप होतें आणि सर्व तीर्थांचें स्नान घडतें ॥ ३० ॥

गंगायमुनयोर्मध्ये बालरंडां तपस्विनीं ॥
बलात्कारेण गृण्हीयात्तद्विष्णो परमं पदं ॥ ३१ ॥

गंगा आणि यमुना यांच्या मध्यें एक बालविधवा तपस्विनी आहे तिचा बलात्कारानें जो संभोग घेतो तो विष्णुपदाला प्राप्त होतो ॥ ३१ ॥

जलस्नानं मलत्यागि भस्मस्नाद्वहिः शुचिः ॥
मंत्रस्नाच्छुचिश्चान्तर्ज्ञानस्नानात्परं पदं ॥ ३२ ॥

जलस्नानानें अंगशुद्धि होते, भस्मस्नानानें त्वचाशुद्धि होते, मंत्रस्नानानें अंतःशुद्धि आणि ज्ञानस्नानानें परमपद प्राप्ति होते ॥ ३२ ॥

अंतःस्नानविहीनस्य बहिःस्नानेन किं फलं ॥
मळयाचलसंभूतो न वेणुश्चन्दनायते ॥ ३३ ॥

ज्यानें अंतःस्नान केलें नाहीं त्याच्या बहिस्नाना काय उपयोग. मलयागिरीवर उगवलेला वेळु चंदन होत नाहीं ॥ ३३ ॥

मंत्रस्नानाच्छुद्धचित्तः स चांतःशुद्धिमाप्नुयात ॥
अंतर्बहिश्च शुद्ध्यार्थं ज्ञानस्नानं च मोक्षदं ॥ ३४

मंत्रस्नानानें चित्तशुद्धि होते हें खरें पण त्यामुळे बाह्य शुद्धीचा लाभ होत नाहीं. यास्तव अंतर्बाह्यशुद्धी करितां ज्ञानस्नानच मोक्ष देणारें अहे ॥ ३४ ॥

वटबीजेऽपि सूक्ष्मेऽपि मायया गुणयुक्तया ॥
यदस्ति सर्वतो वृक्षः कुत आयाति तद्वद ॥ ३५ ।

वटबीज अतिसूक्ष्म असतें परंतु त्या बीजांत—पुढे

होणारा अवाढव्य वृक्ष असतो याचें कारण माया ही गुणयुक्त आहे. तसें नसतें तर पुढें होणारा तो वृक्ष त्या बिजापासून उत्पन्न झालाच नसता ॥ ३५ ॥

तथैवाभ्यंतरे शुद्धे बहिः शुद्ध्यंति तत्क्षणात् ॥
बीजवृक्षादिन्यायेन सर्वत्रैक्याच्छुचिर्भवेत् ॥ ३६ ॥

त्याचप्रमाणें वटबीज वृक्ष न्यायानें बाहि:शुद्धीपेक्षां अंत:शुद्धीचीच योग्यता अधिक आहे. अभ्यंतर शुद्धीनें बहिःशुद्धि आपोआप तत्काळ होते. कारण वरील न्यायानें बाह्याभ्यंतराचें ऐक्य आहे ॥ ३६ ॥

नैकतत्त्वस्वरूपं चेदुत्पन्नं ज्ञानमश्नुति ॥
अहं ममेति चाज्ञानभ्रमतो ह भ्रमेद्वृथा ॥ ३७ ॥

एका तत्वस्वरूपाचें जर ज्ञान झालें नाहीं तर शाब्दीक ज्ञान निष्फळ होतें. मी आणि माझें ह्या भ्रमांत प्राणि

व्यर्थ गुरफटला जातो ॥ ३७ ॥

दुर्लभो विषयत्यागी दुर्लभं तत्त्वदर्शनं ॥
दुर्लभा सहजावस्था सद्गुरोः करुणां विना॥३८॥

विषयाचा त्याग करणारा पुरुष किंवा तत्वदर्शन हीं जशी दुर्लभ आहेत त्याचप्रमाणें सद्गुरूच्या कृपेवांचुन सहजाअवस्था प्राप्त होणें दुर्लभ आहे ॥ ३८ ॥

ऋषिसिद्ध उवाच ।

कथं भगवतो ज्ञानं शुद्धमत्यन्तमुद्भवेत् ॥
तत्रोपायं मुने ब्रूहि मयि तेऽनुग्रहो यदि ॥ ३९ ॥

ऋषिसिद्ध ह्मणतातः—हे मुने, माझ्यावर जर आपला अनुग्रह असेल तर अत्यंत शुद्ध असें भगवंतांचें ज्ञान कसें उद्भवेल त्याचा मला उपाय सांगा ॥ ३९ ॥

कपिल उवाच ।

जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिप्रपंचो यत्प्रकाशितः ॥

तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधात्प्रमुच्यते ॥ ४० ॥

कपिल ह्मणतात—जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति इत्यादि अवस्थामय प्रपंच ज्याच्याकडून प्रकाशित होत तेंच ब्रह्म होय असें जाणल्यानें प्राणी सर्व बंधापासून मुक्त होतो. ॥ ४० ॥

त्रिषु धामसु यो भोग्यो भोक्ता भोग्यं च यद्भवेत् ॥
तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिवः॥४१।

यावरील तीन अवस्थांमध्यें—भोग, भोगाच आणि भोग्य जो आहे त्यापेक्षां विलक्षण असलेला चिन्मात्र साक्षी असा मीच सदाशिव आहे असें ज्ञानी जाणतो. ॥ ४१ ॥

एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा ॥ सर्वाध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥ ४२ ॥

सर्व भूतांत गूढ असलेला एकच देव असून तो सर्व-व्यापी आणि सर्व भूतांचा अंतरात्मा आहे. तो सर्वाध्यक्ष असून सर्वांचा आधार आहे. आणि तो सर्वसाक्षी असून निव्वळ निर्गुण असा आहे ॥ ४२ ॥

पिंगला द्वादशादित्या इडेंदुः षोडशांशभाक् ॥
पंचान्तःकरणानि स्युः प्राणानां पंचकं तथा ॥४३॥

पिंगला नाडी हे द्वादश दिवाकर असून इडा हीं षोडशकलांचा चंद्र होय. अंतःकरणें पांच असून प्राणाचेही पांच भाग आहेत ॥ ४३ ॥

ज्ञानेंद्रियाणि पंचैव पंच कर्मेंद्रियाणि वै ॥
विषयाः पंच वै प्रोक्ता विकल्पानां च पंचकं॥४४॥

ज्ञानेंद्रियें पांच असून कर्मेंद्रियेंही पांचच आहेत. विषय पांच आणि विकल्पही पांचच आहेत. ॥ ४४ ॥

विकाराः षण्मतास्तेन देहस्यात्मप्रवर्तनं ॥
एवं गुणास्तु सर्वत्र कलाकाष्ठाचतुर्थकं ॥ ४५ ॥

विकार सहा असून ते आत्म्याकडून देहाला प्रवृत्त करतात हे गुण परिणाम सर्व चराचर पदार्थांत असतात. ॥ ४५ ॥

इक्षुदंडे शर्करा च श्रीखंडे च सुवासितं ॥
क्षीरे यथाऽऽज्यं प्राज्यं तिले तैलं तथाऽऽत्मनां४६

उसाच्या पोटांत जशी साखर, चंदनांत जसा सुगंध, दुधांत जसें तुप आणि तिळांत जसें तेल त्याचप्रमाणें वस्तुमात्रांत आत्मा आहे ॥ ४६ ॥

अभ्यासेन विनाऽप्राप्यो गुरुवाक्येन निश्चितः ॥
स्वात्मा च हृदि पद्मे हि विज्ञेयो ज्योतिरात्मकः ४७

त्या आत्म्याचें दर्शन अभ्यासाशिवाय होणें शक्य नाहीं, ह्मणून गुरुवचनावर पूर्ण विश्वास ठेवून, अभ्यासानें आपल्या हृत्कमळांत असलेला ज्योतिःस्वरूप आत्मा ओळखावा ॥ ४७ ॥

प्रथमं तु शिरःपद्मं नेत्रपद्मं द्वितीयकं ॥
तृतीयं कर्णपद्मं च मुखपद्मं चतुर्थकं ॥ ४८ ॥

पहिलें शिरःकमळ, दुसरें नेत्रकमळ, तिसरें कर्णकमळ व चवथें मुखकमळ ॥ ४८ ॥

पंचमं करपद्मं वै षष्ठं चरणपद्मकं ॥
सप्तमं नाभिपद्मं च हृत्पद्मं चाष्टमं स्मृतं ॥ ४९ ॥

पांचवें हस्तकमळ, सहावें चरणकमळ, सातवें नाभिकमळ आणि आठवें हृत्कमळ. अशीं अष्टकमलें सांगितलीं आहेत ॥ ४९ ॥

अष्टपद्मात्परं ब्रह्म सूक्ष्मं हृदय कंजं ॥
चक्रातीतं परस्थानं सूक्ष्ममोंकारसंज्ञितं ॥ ५० ॥

या आठही कमळाहून श्रेष्ट असें ॐकारसंज्ञक सूक्ष्म हृदय कमळाचें आधारस्थान चक्रातीत आणि अति सूक्ष्म ब्रह्म आहे ॥ ५० ॥

हृत्पद्मकर्णिकामध्ये शुद्धविज्ञानतत्परं ॥
अंगुष्ठमात्रममलं ध्यानेर्लोकात्मसीश्वरं ॥ ५१ ॥

हृदयकमळाच्या कर्णिकेंत शुद्ध, विज्ञानपर, अंगुष्टमात्र निर्मळ असा सर्वव्यापी ईश्वर असतो त्याला चित्तवृत्तींच्या निरोधानें पहावें ॥५१ ॥

रात्रौ स्थूलं च विश्रांतं मध्ये दीपस्य स्थापनं ॥
सार्धहस्तात्रिकच्छेदं तत्र निष्ठेत लोकयन् ॥ ५२ ॥

रात्रीं या साडेतीन हात लांबीच्या स्थूळ देहांत अमर्दा

पुरो भागीं स्थापिलेल्या मोठ्या व शांत आलज्योतिमय दीपास पहात रहावें ॥ ५२ ॥

लोक्यमानस्य दीपस्य मध्ये नीलं च दृश्यते ॥
नीलमध्ये तथा पश्येद्यो वै द्रष्टा स उत्तमः ॥ ५३॥

या दीपाकडे पाहत राहिलें असतां त्यांत जो एक निळाबिंदु दिसूं लागतो त्याच्याचकडे पघत रहावें असें जे करतो तोच उत्तम द्रष्टा होय ॥ ५३ ॥

तत्रैव पश्यतो यस्य निमेषोन्मेषवर्जितं ॥
यदा दृष्टिः स्थिरा भूयात् सोंऽतर्लक्षी तदोच्यते५४

त्या नीळ बिंदूंतच लक्ष स्थिर करावें. नेत्रांचें निमेषोन्मेलनही करूं न ये. अशी ज्या दृष्टि स्थिर झाली तो अंतर्लक्षी असें म्हटला जातो ॥ ५४ ॥

अंतर्लक्ष्यविहीनस्य बहिर्लक्ष्यं निरर्थकं ॥

लक्ष्यालक्ष्यस्य वै लक्ष्यलक्षितं स्वयमात्मनि ॥५५॥

जो अंतर्लक्षी नाहीं त्याचें बहिर्लक्ष फुकट आहे. लक्ष्याचा विषय न होणारें असें जें ब्रह्म तें एकाग्रचित्तांत आपोआप लक्ष्यलक्षित होतें ॥ ५५ ॥

यथा वारि मरुद्भूतं नानाकारं विलोक्यते ॥
तथैव कल्पना यस्य चिद्ब्रह्माणि स मुह्यति ॥५६॥

वाऱ्यामुळें पाण्याला जसे अनेक तऱ्हांचे आकार येतात तद्वत् मनाच्या चंचलतेमुळें ज्याच्या चिद्ब्रह्मांत अनेक कल्पना उद्भवतात त्याचा आत्मविवेक पार नाहींसा होता ॥ ५६ ॥

दृष्टिद्वयसमत्वेन गुरुलब्धेन यो युतः ॥
ज्ञातव्यस्तेन वै सूर्यश्चित्तं स्थिरमिदं यतः ॥ ५७ ॥

गुरूपासून मिळालेल्या द्वय दृष्टींनीं जो युक्त असतां

त्याजच हा स्वयंप्रकाश सूर्य जाणण्यास योग्य होतो ।५७।

मीनः स्नानरतः फणी पवनभुङ्मेषस्तु पर्णाशनो ॥
नैराश्यं खलु चातकः प्रतिदिनं शेते बिले मूषकः॥
भस्मोद्धूलितविग्रहः खलु खरो ध्यानानुरक्तो बकः ॥
सर्वेषां फलमेव नास्ति सकलं ज्ञानप्रधानं तपः॥५८।

स्नान करणें, वायुभक्षण अथवा पर्णभक्षण करून रहाणें, नस्ती विरक्ति धारण करणें, एकांतांत बीळरूपी गुहेत वस्ती करणें, भस्मांत लोळणें, ढोंगाचें ध्यान धारण करणे वगैरे गोष्टींनी जर मोक्ष मिळत असता तर वरील गोष्टींच्या अनुक्रमानें—मासे, सर्प, बकरे, चातक, उंदीर, गाढव, बगळे- हे आचरण करणारे केव्हांच उद्धरून गेले असते. कारण ते ते त्या त्या गोष्टी करीत असतात; परंतु खरें तसें नाहीं तर, कोणतेंही तप ज्ञानप्रधान

असलें तरच तें आपलें फळ देण्यास समर्थ होतें असा सिद्धांत आहे ॥ ५८ ॥

मार्गं मानुष्यमीनं च त्रिषु लोकेषु दुर्लभं ॥
यः पठेत्सततं भक्त्या स मुक्तो भवसागरात्॥५९॥

मानुष्य मीनादि जे अनेक मार्ग आहेत त्यांतील हे पाहिले दोन मार्ग त्रिभुवनांत अति दुर्लभ आहेत. त्यांच्या ज्ञानप्राप्तीकरितां जो कोणी हा ग्रंथ नेहमीं भक्तीनें पठन करतो तो मुक्त होतो ॥ ५९ ॥

अष्टांगं च चतुष्पादं त्रिस्थानं पंच देवताः ॥
ॐकारं यो न जानाति ब्रह्मविष्णुशिवात्मकं ६०

आठ अंगें, चार पाय, तीन स्थानें आणि पांच देवता यांनीं युक्त असें जें ब्रह्म, विष्णु आणि महेश यांचें त्रिकूट त्याला जो ओळखीत नाहीं तो अधम होय ॥ ६० ॥

ॐकारं पितृरूपेण गायत्रीं मातरं तथा ॥
पितरौ यो न जानाति स विप्रश्चान्यवीर्यजः ॥६१॥

ॐकार पितृरूप असून गायत्री मातृरूप आहे. या मातापितरांस जो ओळखीत नाहीं तो ब्राह्मण कुसंभव होय ॥ ६१ ॥

इदं तीर्थमिदं तीर्थं भ्रमंति तामसा जनाः ॥
आत्मतीर्थं न जानंति कथं मोक्षः शृणु प्रभो ।६२॥

हें तीर्थ तें तीर्थ असें ह्मणत तामसी लोक इतस्ततः भ्रमण करीत असतात; परंतु ते आत्मतीर्थाला ओळखीत नसल्यामुळें त्यांना मोक्ष कसा मिळणार ? ॥ ६२ ॥

ज्ञानं भागीरथी गंगा तत्र विश्रामयतां मनः ॥
प्रातःप्रभृति संध्यांतं संध्यातः प्रातरंतरं ॥ ६३ ॥

ज्ञान हीच भागीरथी गंगा असल्यामुळें त्यांतच प्रातः—

काळापासून सायंकाळापर्यंत आणि सायंकालापासून प्रातः-
कालपर्यंत साधकानें आपलें मन स्थिर करावें ॥ ६३ ॥

यत्करोमि जगन्नाथ तदस्तु मम पूजनं ॥ ६४ ॥

हे जगन्नाथा, मी जें कांहीं करतों तें सर्व आत्मरूप
माझेंच पूजन असो ॥ ६४ ॥

मनश्चित्ततुरंगाभ्यां शरीरं स्यंदनायते ॥
कालचक्रेण वै याति पूर्वकर्म च सारथिः ॥ ६५ ॥

मन आणि चित्त या दोन घोड्यांनीं युक्त असलेलें
शरीर रथरूप पावतें तें कालरूपी चक्रांनीं चालतें. त्याला
त्याचें पूर्व कर्मरूप सारथी चालवितो ॥ ६५ ॥

यद्दिने पतितोऽबिंदुर्मातृगर्भे सुनिश्चितं ॥
तद्दिने लिखितं सर्वं हानिमृत्युसुखोत्तरं ॥ ६६ ॥

ज्या दिवशीं मातृगर्भांत रेताबिंदूची स्थापना होते त्याच

दिवशीं त्या जन्म घेणाऱ्या प्राण्याचा हानी, मृत्यु, सुखा-
दिकांचें सर्व लिखित तयार होतें ॥ ६६ ॥

येथें कपिल गीतेचा राजराजेश्वरयोग नांवाचा
चवथा अध्याय समाप्त झाला.

## अध्याय पांचवा.

सूत उवाच ।

प्रणम्य दंडवद्भूमौ स्तुत्वा च सच्चरित्रकं ॥
अर्चित्वा पादपद्मं च पुनः प्रश्नं करोति च ॥ १ ॥

सूत ह्मणतातः—शिष्यानें साष्टांग नमस्कार घालून, सुंदर चरित्राची स्तुति करून आणि पादारविंदाची पूजा करून गुरूला पुन्हां प्रश्न केला ॥ १ ॥

चतुर्योगस्य व्याख्यानात्कष्टात्कष्टं भवेन्महत् ॥
कदाचित्प्राप्यते मृत्युः पुनर्जन्म भवेद्ध्रुवं ॥ २ ॥

चतुर्योगावर व्याख्यान झोडीत बसल्यास फाच त्रास होईल इतकेंच नव्हे तर कदाचित् मरणही येईल आणि तों आल्यास निश्चयानें पुनर्जन्म घ्यावा लागेल ॥ २ ॥

नानायोनिगतः पश्चात्प्राप्यते नरजन्म हि ॥
नरो नारायणः साक्षात् कैवल्यं ब्रह्म शाश्वतं॥३॥

अनेक योनींतून भटकल्यावर नरजन्म प्राप्त होतो. नर हा प्रत्यक्ष नारायण असून, नारायण होणें ह्मणजे पुरुषार्थ करणें हेंच साक्षात् कैवल्य व ब्रह्म आहे ॥ ३ ॥

राजराजेश्वरो योगः शिवेन महता पुरा ॥
लोकोपकारहेतोर्वै पार्वती प्रतिबोधितः ॥ ४ ॥

हा राजराजेश्वर योग पूर्वी महादेवांनीं लोकोपकारहे-

तूस्तत्र पार्वतीला सांगितला होता ॥ ४ ॥

भगवद्बोधितः पार्थस्तथा चोद्धव आत्मना ॥
एवं त्वं शाधि मां दीनं नित्यानित्यविवेकतः ॥५॥

भगवंतांनीं याचा उपदेश अर्जुन आणि उद्धव यांस जसा केला त्याचप्रमाणें आपणही मज दीनाला नित्यानित्याचा विवेकपूर्वक उपदेश करा ॥ ५ ॥

तत्पदं त्वंपदमसीत्येतच्चोक्तं तृतीयकं ॥
विस्तरेण मबोद्धव्यं यथार्थं दृष्टिगोचरं ॥ ६ ॥

तत्पद, त्वंपद आणि असिपद अशीं जीं तीन पदें आहेत त्यांचा अर्थ विस्तारानें दृग्गोचर होईल असा जाणणें उचित आहे ॥ ७ ॥

तदा नश्यति संतापो जन्मकोटिसहस्रजः ॥
निमेषोन्मेषयोर्मध्ये जीवन्मुक्तो भविष्यति ॥ ७ ॥

कारण की, त्यामुळें कोट्यवधि जन्मांत झालेला संताप नाहीसा होतो आणि तो साधक निमिषमात्रांत जीवन्मुक्त होतो ॥ ७ ॥

कपिल उवाच ।

अयं प्रश्नो महाश्रेष्ठः श्रेष्ठस्यास्योत्तरं महत् ॥
नाधिकारविहीनस्य शिष्यस्योपदिशेत्कदा ॥ ८ ॥

कपिल म्हणतातः—हा प्रश्न अति श्रेष्ठ असून त्याचें उत्तरही श्रेष्ठतरच आहे. याचा उपदेश अधिकार विहीन अशा शिष्याला कधींच करूं नये ॥ ८ ॥

ऋषिसिद्ध उवाच ।

सर्वेषामपि लोकांनां को वा ज्ञानाधिकारिणः ॥
वद तल्लक्षणं सर्वं तथा संशयनाशनं ॥ ९ ॥

ऋषिसिद्ध म्हणतातः–सर्व लोकांत ज्ञानाधिक कोण ?

या माझ्या संशयग्रस्त प्रश्नाचा उत्तर उलगडा होईल असें याचें लक्षण सांगा ॥ ९ ॥

कपिल उवाच ।

गुरुभक्तिरतो नित्यं सत्यवादी जितेंद्रियः ॥
विप्रश्च वेदवक्ता च शास्त्रषट्कस्य पारगः ॥ १० ॥

कपिल म्हणतातः—नित्य गुरुभक्तीमध्यें रत, सत्यवादी, जितेंद्रिय, विप्र, वेदवक्ता, षट्शास्त्रांत पारंगत

नित्यानित्यविवेकी च इहामुत्र विवर्जितः ॥
तितिक्षोपरतिः शांतिर्मुमुक्षोस्तस्य लक्षणम् ॥ ११ ॥

नित्यानित्य विवेकी, ऐहिक व फार लौकिक फलाची इच्छा न करणारा, सहनशील, उपरती झालेला आणि शांति या लक्षणांनीं असलेला मुमुक्षु या उपदेशाचा अधिकारी आहे. ॥ ११ ॥

कुर्वंतः सर्वकर्माणि अर्चंतः सर्वदेवताः ॥
अटंतः सर्वतीर्थानि फलं नेच्छंति सर्वथा ॥ १२ ॥

सर्व कर्मे करीत राहून सर्व देवतांचें पूजन करणारे आणि सर्व तीर्थयात्रांनीं पुनीत होऊन फलाची इच्छा न धरणारे तेच याच्या उपदेशाचे अधिकारी आहेत॥१२॥

कामः क्रोधस्तथा लोभो मोहो मात्सर्यमेव च ॥
दंभोऽहंकार इत्येतैजाग्रत्स्वप्नैश्च वर्जितः ॥ १३ ॥

काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, दंभ, अहंकार व विपरीत दर्शनरूप जाग्रत् व स्वप्न यांनीं जो रहित तोच अधिकारी होय ॥ १३ ॥

निंदको वंचको धूर्तः खलो दुष्कृतितामसौ ॥
एते नारकिणः प्रोक्तास्तानेतान् परिवर्जयेत् ॥१४॥

निंदक, फसव्या, लबाड, दुष्ट, वाईट कृत्यें करणारा

व तामसी अशा स्वभावाचे जे पुरुष ते नरकांत पडणारे असल्यामुळें उपदेशास अपात्र आहेत ॥ १४ ॥

अभक्ते वंचके धूर्ते पाषंडे नास्तिके नरे ॥
मनसाऽपि न वक्तव्यं गुरुगुह्यं कदाचन ॥ १५ ॥

अशक्त, वंचक, लबाड, पाखंडी आणि नास्तिक अशा पुरुषास मनानेंही कधी गुरुगुह्य सांगूं नये ॥ १५ ॥

शांतो दांतः क्षमी शूरः सर्वेंद्रियसमन्वितः ॥
असक्तो ब्रह्मज्ञानेच्छुः सदा साधुसमागतः ॥१६॥

शांत, दमनशील, क्षमावान, शूर, सर्व इंद्रियें चांगलीं असून तीं ताब्यांत ठेवणारा, विषयासक्तीपासून पराङ्मुख ब्रह्मज्ञानाची इच्छा असणारा, नेहमीं साधुसमागम करणारा ॥ १६ ॥

साधुबुद्धिः सदाचारी योऽभेदः सर्वदैवते ॥

आशापाशविनिर्मुक्तस्त्वेते मोक्षाधिकारिणः ॥१७॥

साधुबुद्धीचा, सदाचारी, दैवतांत भेद न मानणारा आणि अशा पाशांतून मुक्त असा जो तोच मोक्षाधिकारी आहे ॥ १७ ॥

अनेकजन्मसंस्काराश्रीगुरोश्च कृपावशात् ॥
प्रत्यक्षश्च परोक्षश्च विवेकः प्राप्यते बुधैः ॥ १८ ॥

अनेक जन्मसंस्कारामुळें आणि श्रीगुरुच्या कृपेमुळें, प्रत्यक्ष आणि परोक्ष विवेक सुज्ञांसच होतो ॥ १८ ॥

भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावरे ॥ १९॥

परब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां, हृदयग्रंथि तुटून सर्व संशय नाश होतो आणि प्रारब्धावांचुन इतर सर्व संचित आणि क्रियमाण कर्मे क्षीण होतात ॥ १९ ॥

दृष्टांतरं प्रवक्ष्यामि सर्वसिद्धांतविस्तरं ॥
वेदांते च प्रकाशं यत्तत्त्वं श्रेष्ठमनुत्तमं ॥ २० ॥

या दृश्य प्रपंचाहून अगदीं भिन्न असलेले सर्व सिद्धांत विस्ताररूप आणि वेदान्तांत प्रसिद्ध असलेलें श्रेष्ठ व अनुत्तम असें जें तत्त्व तें आतां सांगतों ॥ २० ॥

गोपितः सर्वशास्त्राणां विस्तरः कथ्यते मया ॥
सर्वेषामधिकं तत्त्वं दृष्टांतरं च दृश्यते ॥ २१ ॥

सर्व शास्त्रांतील गुह्यार्थ मी सांगतों त्यामुळें सर्वांहून अधिक तत्व व प्रसिद्ध अशा या दृष्टहून जें भिन्न दृष्ट तत्व तें दिसेल ॥ २१ ॥

ज्ञातव्यमंतरंगस्थं बहिरंगं च पश्यति ॥
प्रत्यक्षं चैव पश्यंति दृष्टांतरं च दृश्यते ॥ २२ ॥

अंतरंगांत तत्व समजण्याचा योग असतांना अज्ञजन

बहिरंग तत्व पहातात. प्रत्यक्ष दिसेल तेवढेंच त्यांस मान्य होतें; परंतु आमचा उपदेश अंतरंगतत्व दाखवितो ॥२२॥

प्रथमं नादलुब्धश्च बिंदुश्चैव तदुच्यते ॥
तृतीयं च कला प्रोक्ता ज्योतिरूपं च पश्चात ॥२३

साधक प्रथम—नादलुब्ध, नंतर बिंदु, मग कळा व शेवटीं ज्योतिरूप पहातो ॥ २३ ॥

अकारं नादरूपं च उकारं बिंदुरूपकं ॥
मकारं तु कला प्रोक्ता ओंकारं ज्योतिरेव हि॥२४॥

अकार नादरूप असून उकार बिंदुरूप आहे आणि मकार कळारूप असून ॐकार स्वतः ज्योतिः आहे॥२४॥

लुब्धो नागस्वरैः सर्पो घंटानादैः कुरंगकः ॥
पतंगो लुभ्यते दीपैर्मनो नादेन लुभ्यते ॥ २५ ॥

सुरावर असा नाग लुब्ध होतो अथवा हरिण घंटानाद

अथवा पतंग दीपज्योतीवर लुब्ध होतो त्याप्रमाणें मन हें ॐकार नादावर आसक्त होतें ॥ २१ ॥

पतंगमीनहरिणगजालयाप्यातकर्मीः ॥
इंद्रियाणि मनुष्यस्य भज्यंते किंतु चिंतया ॥ २६॥

पतंग, मासा, हरिण, हत्ति व भ्रमर हें पांच प्राणी अनुक्रमें—रूप, रस, शब्द, स्पर्श आणि गंध या पांच विषयांकरितां आपलें जीव देतात; परंतु मनुष्याला त्या पांचही विषयांचा भोग एकदम घेण्याचीं इंद्रियरूप साधनें असतां—त्यांचें नियमन न केल्यास त्यांचें कसें काय होईल याबद्दल फारसा विचार करीत बसण्याचें कारणच नाहीं ॥ २६ ॥

यथा चुंबकपाषाणः सूचिका च पृथक् तथा ॥
उभयोर्दर्शने योगो मोहितं तत्र लिप्यते ॥ २७ ॥

लोहचुंबक आणि सुई ह्या दोन वस्तु अगदीं स्वतंत्र असतांना त्या परस्परांच्या सांनिध्यामुळें परस्परांचें दर्शन होतांच परस्परांवर मोहित होऊन एकमेकांस आलिंगन देतात–चिकटतात ॥ २७ ॥

तथैव च मनुष्याणामात्मा च हि पृथक् तथा ॥
मानसं तत्र लीयेत इंद्रियैः किं विचेष्टयते ॥ २८॥

त्याचप्रमाणें मनुष्याचा आत्मा आणि मनहीं अगदीं पृथक् असतांहीं एकमेकांत विलीन होतात, मग त्यामुळें इंद्रियांच्या चेष्टांतील कथा काय? ॥ २८ ॥

तद्देह आत्मभावेन मानसं लिप्यते सदा ॥
इंद्रियादि स्थिरं यस्य तन्मनो ह्युन्मनो भवेत्॥२९॥

ज्यांचें मन आत्म्यामध्यें विलीन झालें आहे त्यांच्या देहांत मन सदोदित आत्मभावानेंच असतें, ज्याचीं इंद्रियादि

स्थिर असतात त्यांचें मन उन्मन होतें ॥ २९ ॥

घृते कृता च प्रतिमा चोष्णेनैव विलीयते ॥
लवणे जलविक्षिप्तं लवणत्वं द्विलीयते ॥ ३० ॥

भिजलेल्या तुपाची केलेली मूर्ति जशी उष्णतेच्या योगानें वितळून जाते तद्वतच पाण्यांत टाकलेलें मीठ जलरूप बनतें ॥ ३० ॥

तथैव स्वात्मभावेन ह्युन्मनस्त्वं मनो व्रजेत् ॥
दृश्यते त्वरया दृष्ट्या चित्तं तत्र लयं गतं ॥ ३१ ॥

त्याचप्रमाणें मनाचें उन्मनत्व होण्याला आत्मभावच कारण होतो. आत्म्यांत निमग्न झालेलें मन सूक्ष्म दृष्टीनेंच अनुभवाला येतें ॥ ३१ ॥

शर्करा जलसंयुक्ता शर्करात्वं हि गच्छति ॥
सगुणं ध्यायतो तिस्रं निर्गुणत्वं तथोच्यते ॥ ३२ ॥

पाण्यांत टाकलेली साखर ज्याप्रमाणें आपलें रूप जलांत लीन करते त्याचप्रमाणें सगुण परमेश्वराचें ध्यान करतां करतां निर्गुणत्व सिद्ध होतें ॥ ३२ ॥

फलस्य कारणं पुष्पं फलात्पुष्पं नश्यति ॥
ज्ञानस्य कारणं कर्म ज्ञानात्कर्म निश्यति ॥ ३३ ॥

फळाला कारण पुष्प आहे पण फळ आलें असतां जसें पुष्प नाहींसें होतें त्याप्रमाणें ज्ञानाचें कारण कर्म असतां ज्ञान प्राप्त झालें कीं तें नष्ट होतें ॥ ३३ ॥

पानीयचोरन्यायोऽयं भांडं यज्जलपूरितं ॥
यस्याधश्छिद्रदशकमूर्ध्वेकं तु च्छिद्रकं ॥ ३४ ॥

तेथें हा प्राणी व चोर यांचा न्याय लागु पडतो पाणी भरलेलें एक भांडें असून त्याच्या बुडाला दहा छिद्रें व वर एक अशीं आहे ॥ ३४ ॥

छिद्रमूर्ध्वमिदं सूक्ष्मं तथापि जलरोधकं ॥
मुक्तेऽस्मिन् भाण्डभेदश्च जलस्यापि च निष्क्रमः३९

वर असलेलें भोंक वारीक असून सर्व छिद्रांतून गळणाऱ्या पाण्याला प्रतिबंध करणारें आहे वरचें छिद्र जर मोकळें सोडलें तर भांडें फुटून पाणीही वाहूं लागतें (एका मनाचें प्रतिबंधन केलें असतां दाही इंद्रियें प्रतिबद्ध होऊन रहातात—तात्पर्य.)

प्राप्तकाले च विप्रर्षे मानसं भयमाप्नुयात् ॥
तत्सर्वं कथयिष्यामि सावधानं शृणुष्व च ॥ ३६॥

चित्त एकाग्र करण्याचा प्रसंग प्राप्त झाला असतां मन भयभीत होतें तें मी तुला सांगतों तें सावधान चित्तानें ऐक ॥ ३६ ॥

स्त्रीणामादौ यथा भीतिः पुरुषस्यादिसंगमे ॥

तथाऽसां चित्तविक्षेपः प्राप्तानां स्वामिमंदिरं ॥३७॥

स्त्रीपुरुष संगमामध्यें स्त्रियांनां प्रथम फारच भीति वाटते; परंतु एकदां का त्या संभोगाची गोडी स्त्रियांनां लागली कीं, त्या भोगाबद्दल सर्व तऱ्हांचे मानसिक विकार नाहींसे होऊन स्त्रियांनां उलट त्याविषयीं प्रेमच वाटूं लागतें ॥ ३७ ॥

पुरुषस्याऽल्पसंगेन गतायाता तु सोच्यते ॥
लज्जाभीति यदा नष्टे तस्याः संश्लिष्टता च सा॥३८

पुरुषाशीं स्त्रीचा जरी थोडा संपर्क झाला तरी तिला भीति आणि लज्जा यांचा भाव होतो; परंतु परिचय वाढला ह्मणजे मग या दोहोंचा ठावही रहात नाहीं ॥ ३८ ॥

पुरुषं तु वशीकृत्य गृहिणी गृहमुच्यते ॥
तदा सुलीनता प्रोक्ता सर्वसिद्धिविधायिनी ॥ ३९॥

हेंच उदाहरण घेऊन त्यांनें पुरुषास वश करून अल्यावर त्या गृह ह्मणूं लागतात. याचप्रमाणें मनाची सतद्व ठायीं उत्तम तऱ्हेची लीनता होणें हेंच सर्व यचकारण आहे ॥ ३९ ॥

शरीरं भुवनं यस्य हृदयं रतिमंदिरं ॥
आत्मा च पुरुषः प्रोक्तो मानस प्रकृतिस्तथा ॥४०

शरीर हेंच वर असून त्यांतलि हृदय हें रतिमंदिर आहे आणि आत्मा पुरुष असून मन प्रकृति आहे ॥४०॥

विक्षेपता गतायाता संश्लिष्टता सुलीनता ॥
एवं हि प्रोच्यते सद्भिर्भूमिकानां चतुष्टयं ॥ ४१ ॥

विक्षेयता, गतामाया, संश्लिष्टता आणि सुलीनता याप्रमाणें चार भूमिका आहेत असें संतांनीं सांगितलें आहे ॥ ४१ ॥

आरंभे श्रवणं कृत्वा मनसा च विचारणं ॥
निदिध्यासनमभ्यासः साक्षात्कारस्तदा भवेत् ४२

प्रथमारंभीं श्रवण करून नंतर मनानें त्याचा विकार केल्यावर निदिध्यासनाच्या अभ्यासानें साक्षात्कार होतो ॥ ४२ ॥

एवं क्रमेण बोद्धव्यं विचार्यं च पुनःपुनः ॥
अकस्माद् गुरुसंतोषात् साक्षात्कारश्च तत्क्षणात् ४३

याप्रमाणें ज्ञान करून घेऊन पुनः पुनः विचार करावा. अकस्मात् गुरुप्रसाद झाल्यास तत्क्षणींच साक्षात्कार होतो ॥ ४३ ॥

मृदा नूनं भवेद्भांण्डं पुनस्तत्र मृदेव च ॥
एवं ब्रह्मरतो लोकः संसारेण न लिप्यते ॥४४॥

निरोधी पदार्थांसही आपल्या पोटांत धारण करणारा

मातीचा पक्वकुंभ फोडल्यावर जसा पुन्हां मृत्तिकारूपच होतो तद्वत्, ब्रह्मरत पुरुष ब्रह्मरूप होऊन संसाराची त्याला बाधा होत नाहीं ॥ ४४ ॥

पठित्वा वेदशास्त्राणि ब्रह्मज्ञानविवर्जितः ॥
न नष्टविषयासंगः पठित्वा किं प्रयोजनं ॥ ४५ ॥

विषयासक्ति नष्ट न होतां ब्रह्मज्ञानाचा गंधही नाहीं तर वेदशास्त्रपठनाचा कांहींच उपयोग होत नाहीं ॥४५॥

पुस्तकानि पठेद्यस्तु वाक्यार्थं च करोत्यपि ॥
अमेध्यं भक्षितं तेन पठित्वा किं प्रयोजनं ॥४६॥

ज्यानें अभक्ष्य भक्षण सोडिलें नाहीं त्यानें अनेक पुस्तकें वाचून त्यांतील वाक्यांचे अर्थ जरी सांगितलें तरी तें सर्व निरर्थक होय ॥ ४६ ॥

उदकेन भवेत्पंकः स च तेनैव शुद्ध्यति ॥

मनः करोति वै कर्म मुच्यते मनसैव तत् ॥ ४७ ॥

पाण्यापासून उत्पन्न होणारा चिखल जसा पाण्यानेंच नाहींसा होतो तद्वतच मनानें केलेलें कर्म मनानेंच शुद्ध होतें ॥ ४७ ॥

मनः करोति कर्माणि पातकैर्लिप्यते मनः ॥
मनश्चेदात्मयुग्भूयान्न लिप्येद्धर्मपातकैः ॥ ४८ ॥

मन कर्म करून पापयुक्त होतें; पण तेंच जर आत्मनिष्ठ झालें तर धर्म व पातक यांना लिप्त होत नाहीं॥४८।

कामनासहितं कर्म कुर्याद्यः कामसिद्धये ॥
तदाऽसौ लिप्यते भोगैर्निष्कामो नैव लिप्यते ४९

मनोरथसिद्धीच्या आशेनें जो कर्म करतो तो फलभोगांनीं लिप्त होतो; परंतु निष्काम कर्म करणारा त्यापासून अलिप्त राहतो ॥ ४९ ॥

कर्पासेन भवेद्वस्त्रं कार्पासत्वं न मुंचते ॥
आत्मा स्वसौ भवेज्जीवो जीवे ब्रह्मत्वमुच्यते ५०

वस्त्र कापसापासून जरी होतें तरी तें आपला जसा कापूसपणा सोडीत नाहीं तसेंच आत्मा जरी जीवरूप होतो तरी त्यांत ब्रह्मत्व असतेंच ॥ ५० ॥

सत्त्वेन यायते धर्मः प्रपंचो रजसा तथा ॥
तमोगुणाद्भवेत्क्रोधो गुणत्रयमिदं भवेत् ॥ ५१ ॥

सत्व, रज आणि तम यांचे अनुक्रमें—धर्म, प्रपंच आणि क्रोध हे तीन गुणांचे परिणाम होतात ॥ ५१ ॥

एका च मृद् भांडमनेकरूपं गोक्षीरमेकं बहुवर्णधेनुः ॥
सुवर्णमेकं बहुभूषणानि शरीरभेदः परमार्थ एकः ॥५२॥

मातीं एकच असतां तिचीं जशीं नानातऱ्हेचीं भांडीं होतात किंवा अनेक रंगांच्या जरी गाई असल्या तरी

त्यांच्या दुधाचा रंग एकच असतो अथवा सुवर्णाचे अनेक तऱ्हेचे दागिने बडले जातात तद्वतच शरीरें जरी अनेक आहेत तरी परमात्मा एकच आहे ॥ ५२ ॥

पाषाणैरालयं बद्धं देवः पाषाण एव च ॥
ब्रूहि पंडित देवस्तु कस्मिन्स्थाने स तिष्ठति ॥५३॥

हे पंडिता, देवमंदिरें आणि देव जर पाषाणमयच आहेत, तर देव कोठें रहातो तें सांग पाहूं ॥ ५३ ॥

आत्मलिंगं विष्णुरस्ति संदेहमत्रनाऽऽप्नुयात् ॥
सर्व भूतस्वरूपं च पश्येदेकं विचक्षणः ॥ ५४ ॥

आत्मलिंगाचें चिन्ह विष्णु आहे याबद्दल संशय ठेवूं नये आणि विद्वानानें सर्व भूतें एकरूप जाणावीं ॥ ५४ ॥

स्वगृहे पायसं त्यक्त्वा भिक्षामिच्छति दुर्मतिः ॥
शिलामृद्दारुचित्रेषु देवता बुद्धिकल्पिता ॥ ५५ ॥

मुर्ख मनुष्य ज्याप्रमाणें घरांतील दूध टाकून बाहेभिक्षा मागण्याची वाट धरितो त्याचप्रमाणें हृदयस्थ देवाला सोडून बुद्धीनेंच सामान्यजन—दगड, माती, लाकूड, चिडें यांमध्यें देव आहे असें मानितात ॥ ५५ ॥

हृत्पद्मे परमं तत्वमादिमध्यांतवर्जितं ॥
आधारः सर्वलोकानामनाधारमविक्रियं ॥ ५६ ॥

आदिमध्यांतरहित असून सर्वाधार असतां जें स्वतः निराधार व निर्विकार परमतत्व तें हृदयकमलांत असतें ॥ ५६ ॥

कंटकाग्रं कृतंकेन सिंहशार्दूलविक्रमं ॥
मयूरे नर्तनं केन तेषां च सहजोद्भवं ॥ ५७ ॥

कांटयाच्या अग्रानेंही स्फुरण पावणारे सिंहव्याघ्र किंवा मेघगर्जना ऐकून नाचूं लागणारा मोर हें काय आहे तर तो त्यांचा स्वभावच आहे ॥ ५७ ॥

भ्रमरः कीटकं न्यस्य नीडे स्वे चांतरं गतः ॥
तत्रायं भ्रमरध्यानाद् भ्रमरत्वं प्रपद्यते ॥ ५८ ॥

किडा जसा भ्रमराच्या ध्यानानें काहीं कालानें भ्रमरत्व पावतो तद्वतच आत्मध्यानानें जीव ब्रह्मरूप आत्माच बनतो ॥ ५८ ॥

चक्षुरग्रे स्थितं नित्यं विस्फुरंतं मणिं यथा ॥
तं दृष्ट्वा व्यापकं देवं भवबंधात्प्रमुच्यते ॥ ५९ ॥

डोळ्यांपुढें नित्य स्फुरण पावणाऱ्या रत्नाप्रमाणें त्या व्यापक देवाला ध्यानयोगानें बघून मनुष्य भवबंधनांतून मुक्त होतो ॥ ५९ ॥

चक्षुरग्रे स्थिता छाया सा माया मूलरूपिणी ॥
दृश्यादृश्यस्वरूपेण शिवसायुज्यकारिणी ॥ ६० ॥

डोळ्यांपुढें असलेली छाया मूलरूपिणी असून ती

दृश्यादृश्य स्वरूपानें शिवसायुज्य करीत असते ॥ ६० ॥

चतुर्मध्ये स्थितं गुह्यमंगुष्ठपर्वमात्रकं ॥
तदूर्ध्वं चापि पर्वार्धं तस्यांतः सूक्ष्मकं ध्रुवं ॥ ६१ ॥

नेत्रांमध्यें अंगुष्ठपर्वमात्र गुह्य असून त्याच्यावर पर्वार्ध मात्र तत्व आहे आणि त्याच्या आंत निश्चयें करून सूक्ष्मक तत्व आहे ॥ ६१ ॥

चक्षुर्दृष्टेः साक्षिभागोऽप्यवलोकनतत्परं ॥
प्रकाशते स्वयं ज्योतिर्नरस्तत्र पश्यतु ॥ ६२ ॥

नेत्रपथाचा साक्षिभाग अवलोकनतत्पर अशा स्वयं ज्योतीला प्रकाशित करितो ह्मणून, साधक पुरुषानें त्याला त्यांत पहावें ॥ ६२ ॥

अचलं निर्मलं शांतं कूटस्थं तेज उच्यते ॥
अमलं निर्मलं चैव शून्यं चापि निरंजनं ॥ ६३ ॥

तें तेज-अचल, निर्मळ, शांत, कूटस्थ, विमल, स्वच्छ, शून्य व निरंजन आहे असें सांगतात ॥ ६३ ॥

शुद्धस्फटिकसंकाशं शुभ्रवर्णो मणिः खलु ॥
तेजोराशिमयं ब्रह्म धार्यते आत्मलिंगकं ॥ ६४ ॥

शुद्ध स्फटिकतुल्य असून जणूं काय शुभ्रवर्ण मणिच असें तें तेजोराशिमय ब्रह्म आत्मलिंग धारण करितें ॥ ६४ ॥

सर्वांगसच्चिदात्मानं ज्ञानदृष्ट्या निरूपयेत् ॥
अज्ञानचक्षुषः क्षेपाद्भांत भानुमिवोषसि ॥ ६५ ॥

सर्वांगांत सच्चिदानंदरूपानें भरून राहिलेल्या त्या परब्रह्मास ज्ञानदृष्टीनें पहावें. अज्ञानदृष्टि नाहींशी केल्यावर उषःकाल सूर्याप्रमाणें तें दिसतें ॥ ६५ ॥

सुवर्णवद्दीप्तिमति ज्ञानाग्नौ परिदीप्यते ॥
जीवः सर्वमलान्मुक्तः स्वर्णवद्दीप्यते स्वयं ॥ ६६ ॥

ज्याची प्रभा उत्तम आहे असा ज्ञानाग्नि देदीप्यमान झाला असतां त्यांत घालून तप्त केलेला जीव सर्व पातकांपासून अलिप्त होऊन सुवर्णाप्रमाणें स्वयंज्योत हो. ।६६।

बहिरंतः स्फुरज्ज्योती रत्नकुंभप्रदीपवत् ॥
स्वप्रकाशं सदाज्ञानमेकरूपमनामयं ॥ ६७ ॥

रत्नकुंभांतील दीपाप्रमाणें अंतर्बाह्य अशी ज्याची स्फुरत आहे असें तें जीवतत्व—स्वप्रकाश, सदा ज्ञान, एकरूप आणि अनामय असें आहे ॥ ६७ ॥

गुह्याद्गुह्यं परं सूक्ष्म चक्षुःस्थानेषु तिष्ठति ॥
तन्मूर्तिर्लक्ष्यतामंडे आपादतलमस्तकं ॥३८॥

तें गुह्याहून गुह्य परमसूक्ष्म असें चक्षुस्थानांत असतें. त्याचा आकार अंडामध्यें आपादमस्तक असा आहे ॥६८॥

मनसा भावयन्मूर्तिं तिष्ठेत्तां पूर्णतेजसं ॥
सा मूर्तिश्चक्षुरग्रेषु तिष्ठत्येव न संशयः ॥ ६९ ॥

अशा त्या पूर्णतेजोमय मूर्तीची मनानें भावना करीत राहिल्यास ती मूर्ति नेत्रांपुढें उभी रहाते यांत संशय नाहीं ॥ ६९ ॥

ऋषिसिद्ध उवाच ।

सिद्धानां चैव सर्वेषां प्रणम्य कपिलं गुरुं ॥
योगसिद्धं महच्छ्रेष्ठं ज्ञानं ज्ञेयं च ब्रूहि मे ॥ ७० ॥

ऋषिसिद्ध ह्मणतो:—सर्व सिद्धांच्या कपिल नांवाच्या गुरूंस प्रणिपात करून,—योगसिद्ध व महच्छ्रेष्ठ असें ज्ञान व ज्ञेय मला सांगा ॥ ७० ॥

कपिल उवाच ।

शृणुष्व ऋषिसिद्ध त्वं यदर्थमिह आगतः ॥
ततः सर्वं प्रवक्ष्यामि निःशेषमचलं तव ॥ ७१ ॥

कपिल ह्मणतात:—हे ऋषिसिद्धा, ज्या अर्थी तूं ऐथें

तत्वज्ञानप्राप्तीकरितांच आला आहेस त्याअर्थी निःशेष व अचल असें सर्व तुला सांगतों ॥ ७१ ॥

प्रणम्य शंकरं देवं परात्परमहेश्वरं ॥
आत्मज्ञानप्रकाशेन प्रत्यक्षं तत्त्वमुच्यते ॥ ७२ ॥

परात्पर महेश्वर शंकरदेवाला नमस्कार करून आत्मज्ञान प्रकाशानें प्रत्यक्षतत्व सांगतो ॥ ७२ ॥

बहिर्गतः कोऽपि शिष्यो निवृत्तः शीघ्रमालयं ॥
प्रतिवेशांधभुवनं द्रष्टुं किंचिच्छशाक न ॥ ७३ ॥

कोणी शिष्य बाहेरून एकदम अंधकारमय घरांत आला असतां त्याला कांहीं वेळ तेथें कांहींच दिसत नाहीं॥७३॥

तत्रैवास्मिन् स्थिरीभूते अंधकारः प्रभा भवेत् ॥
तदैव दृश्यते वस्तु स्वयं चक्षुश्च पश्यति ॥

पण कांहीं वेळ तो तेथेंच राहिल्यावर तेथील
प्रभारूप झाल्यामुळें त्याला तेथील वस्तु दिसं

साक्षात् चक्षुषज्ञान होतें ॥ ७४ ॥

अज्ञानपूर्णे हृदये तमःपूर्णे च मानसे ॥
सततं वर्तमानं हि दृश्यते न च वस्तु वै ॥ ७५ ॥

अज्ञानपूर्ण हृदय व तामेमय मन असल्यामुळें त्यांत असलेलें तत्व दिसत नाहीं ॥ ७५ ॥

पश्यता सुस्थिरीभूय वस्तुनत्सर्वमेव हि ॥
हृदये त्वंधभुवने दृश्यते च निरंतर ॥ ७६ ॥

अंधकारमय हृदयभुवनांत मनाला स्थिर करून पाहूं लागलें असतां सर्व वस्तु तेथेंच निरंतर दिसूं लागतात ॥ ७६ ॥

अकल्पितोद्भवं ज्योतिः स्वयंज्योतिः प्रकाशितं ॥
अकस्माद्दृश्यते ज्योतिस्तज्ज्योतिः परमात्मनि ७७

जिचा अकल्पित उद्भव झाला आहे अशी स्वयंप्रकाश

ज्योति व्यक्त होऊन जी अकस्मात् दिसते ती परमात्मरूपच आहे ॥ ७७ ॥

आनंदकंदसंभूतं ज्ञाननालं सुशोभनं ॥
त्राहि मां नरकाद् घोराद्दिव्यज्योतिर्नमोऽस्तु ते ७८

आनंद कंदापासून उत्पन्न झालेल्या व ज्ञान हें सुंदर देंठ असलेल्या अशा हे दिव्य ज्योति, मी तुला नमस्कार करितों. तूं माझें घोर नरकापासून रक्षण कर ॥ ७८ ॥

विचाराष्टदलोपेतं वैराग्यं कुंकुमं तथा ॥
विरक्तकर्णिकं शुद्धं चंद्रकांतसमप्रभं ॥ ७९ ॥

त्या ज्योतीला विचाररूपी आंठ पाकळ्या असून वैराग्य हें तिचें सौभाग्य आणि विरिंची ही तिची कर्णिका असून तिची कांती चंद्रकांतमण्यासारखी आहे ॥ ७९ ।

सच्चित्तदृश्यते रूपं परं ब्रह्मैव भावितं ॥

**हृत्पुण्डरीकमध्ये तु सोमसूर्याग्निमण्डले ॥ ८० ॥**

सोमसूर्याग्निमंडलाप्रमाणें ज्याची हृदयकमलांत भावना केली होती त्या परब्रह्माचेंच तें सत्-चित्-रूप दिसतें ॥ ८० ॥

**कल्पना तु तडित्प्राया ज्वालानां वह्निरूपता ॥**
**शिवदृष्टया ततो नित्यं क्षणं पश्येद्यथाविधि॥८१॥**

कल्पना विद्युल्लते प्रमाणें चंचल असून विजेच्या ज्वाला जशा अग्निरूप दिसतात व क्षणार्धांत नाहींशा होतात त्याप्रमाणें कल्पनेचें असल्यामुळें सतत प्रत्येक क्षण शिवदृष्टीनेंच पहावा ॥ ८१ ॥

**चूते पूर्वं यथा सन्ति कटुम्लानि फलानि वै ॥**
**पश्चात्तानि यथा यान्ति माधुर्यं च रसात्मताम्८२**

आंब्याचीं फळें प्रथम जशी कडु व आंबट असतात

परंतु तीं पुढें जशीं गोड व रसाळ होतात तसाच हा प्रकार आहे ॥ ८२ ॥

चूतोऽन्तःकरणं ह्यत्र मानसं च तथा फलं ॥
फलं कोमलमेतत्त कटम्लं हि भवेत्तथा ॥ ८३ ॥

अंतःकरण हा आम्रवृक्ष असून मन हें त्याचें फळ आहे; तें कोंवळें असेपयत कडु व आंबट असतें ॥ ८३ ॥

मनः स्थिरं फलमिदं यदा पक्कं भवेत्तदा ॥
माधुर्यं ब्रह्मरसतां प्राप्तं हंसैः सुसेव्यते ॥ ८४ ॥

तेंच मनोरूपी फळ स्थिर झालें असतां पक्क होऊन ब्रह्मरसरूपी माधुर्य त्यांत उत्पन्न होतें व मग संन्याशी (हंस) त्याचें उत्तम रीतीनें सेवन करितात ॥ ८४ ॥

मनो वासनया बद्धं मुच्येन्निर्वासनं यदि ॥
तदैव ब्रह्मरसतां याति तत्पीयते बुधैः ॥ ८५ ॥

वासनाबद्ध असलेलें मन वासनारहित झालें असतां

मुक्त होऊन. ब्रह्मरसतेला योग्य होतें व ज्ञानी त्याचें प्राशन [illegible]रितात ॥ ८५ ॥

ब्रह्मरसः स्वादुतमो हृत्पद्मे पूर्ण आत्मनि ॥
इंद्रैश्वर्यमतः क्षुद्रं का कथेतरभूपतेः ॥ ८६ ॥

राजैश्वर्य तर राहोच परंतु इंद्राचें ऐश्वर्यही ज्याच्यापुढें [illegible]:पदार्थ आहे असा तो अति[illegible] हृदयकम-ळांतील पूर्ण आत्म्यामध्यें असतो ॥ ८६ ॥

विचारदर्पणे यो वै यत्नात्सूक्ष्मं विलोकयेत् ॥
दृश्यते तत्र यद्रूपं नूनं तन्न स्वकात्पृथक् ॥ ८७ ॥

स्वात्म्याहून निराळें नसणारें जें सूक्ष्मतत्वतें विचाररूप आरशांत मोठ्या यत्नानें पाहिलें असतां तेथें दिसतें॥८७॥

हृदये दर्पणे पश्येन्मनस्तत्रावलोकयेत ॥
दृश्यते प्रतिबिंबेन स्वात्मरूपं न संशयः ॥ ८८ ॥

हृदयरूपी आरशांत विचाराचें अवलोकन केलें असतां त्यांत प्रतिबंधकरूपानें आत्मरूप दिसतें यांत संशय नाहीं. ॥ ८८ ॥

आत्मतत्वं दृश्यते तत्र ज्योतीरूपं निरंतरं ॥
चित्तशुद्धिस्थिरत्वेन हृदि भानुः प्रकाशते ॥ ८९ ॥

त्यांत ज्योतिरूप आत्मतत्व दिसूं लागून चित्तशुद्धीमुळें मनस्थैर्य होऊन हृदयांत आत्मसुर्य चमकूं लागतो॥८९।

आत्मा विशुद्धचैतन्यस्वरूपः शाश्वतो विभुः ॥
निर्विकारः स्वयंज्योतिः स्वभावार्कः प्रकाशते ।९०।

आत्मा—शुद्ध, चैतन्यरूप, शाश्वत, व्यापक असाअसून निर्विकार स्वयंज्योति स्वाभाविक "सूर्य प्रकाशमान होतो ॥ ९० ॥

आकाशे काशते सूर्यो गगने चंद्रमास्तथा ॥

खमध्ये रोचते तारा ज्योतिश्चिद्व्योमसंस्थितं॥९१॥

सूर्य जसा आकाशांत प्रकाशतो, चंद्र जसा गगनांत चमकतो आणि तारका जशा अंतरिक्षांत लकाकतात त्याचप्रमाणें चिदाकाशांतील आत्मज्योति देदीप्यमान होते॥९१॥

दृश्यते सूर्यरूपं हि तदाकारं विचिंतयेत् ॥

आत्ममध्ये प्रभारूपं नान्यत्किंचिद्विचिंतयेत् ॥९२॥

सूर्याचें जसें स्वरूप आपणांस दिसतें तद्वतच चित्तांत आत्म्याच्या रूपाचें मनन करावें इतर कशाचेंही करूं नये ॥ ९२ ॥

तज्ज्योतिर्हृदयस्थाने प्रत्यक्षं ब्राह्ममक्षरं ॥

पद्मगर्भे च यः पश्येत्स मुक्तो नात्र संशयः ॥९३॥

जो आपल्या हृदयपद्मांत प्रत्यक्ष दिसणारी ब्रह्म संबंधी अव्यय ज्योति पाहातो तो मुक्त आहे यांत संशय नाहीं ॥ ९३ ॥

ऋषिसिद्ध उवाच ।

त्वमेव भगवन् वेत्सि ज्योतिरूपं यथास्थितं ॥
यज्ज्योतिर्हृदि पद्मेऽस्ति शाश्वतं ब्रह्म केवलं॥९४॥

ऋषिसिद्ध म्हणतातः—भगवन्, कसें स्थित आहे तें आपणच जाणता हृदयकमळांत असणारें जें ज्योतिरूप तच केवळ शाश्वत ब्रह्म होय ॥ ९४ ॥

हृदि पद्मे स्थितं ब्रह्म तत्कथं दृष्टिगोचरं ॥
कुत्रास्ति हृत्पद्ममिदं कथं ज्योतिश्च दृश्यते ॥९५॥

हृदयकमळांत स्थित असणारें ब्रह्मदृग्गोचर कसें होणार? हृत्कमळ कोठें आहे आणि त्यांत ज्योति कशी दिसते ॥ ९५ ॥

त्वं तत्सर्वं वदाऽस्माकं यत्तद्हृदयपंकजं ॥
तन्मध्ये यज्ज्योतिरास्ते दिश ब्रह्म महामुने ॥९६॥

हे महामुने, तें हृदयकमळ, त्यांत असलेली ज्योति वगैरे सर्व आम्हांला सांगा. आम्हांला ब्रह्मोपदेश करा ॥९६॥

कपिल उवाच ।

पादादि जानुपर्यंतं पृथ्वीस्थानं प्रतिष्ठितं ॥
तत्रास्ति पद्ममेकं च सर्वदेहेषु संस्थितम् ॥ ९७ ॥

कपिल ह्मणतातः—तळपायांपासून गुडघ्यापर्यंत पृथ्वीस्थान प्रसिद्ध आहे. त्यांत एक कमळ असून त्याने सर्व देह व्यापिला आहे ॥ ९७ ॥

जान्वादिनाभिपर्यंतमपां स्थानं हि कथ्यते ॥
आधारलिंगं नाभौ च वेदशास्त्रादिसंज्ञितं ॥ ९८ ॥

गुडघ्यापासून बेंबीपर्यंतच्या स्थानाला जलस्थानाला असें ह्मणतात. वेदशास्त्रादि संज्ञित जे आधार लिंग तें बेंबीत आहे ॥ ९८ ॥

त्रिस्थानेषु चतुर्दलाब्जमथ षट्पर्णैर्युतं पंकजं ॥
आस्तेऽन्यद्दशपर्णमब्जमथ वै पर्णेषु तेषां क्रमात्
आद्ये वर्णचतुष्टयं व, श, ष सेत्यन्यत्र षड्वर्णकम्॥
बाद्यं लान्तमथापि वर्णदशकं डाद्यं च फान्तं स्मृतम्९९

त्यांत तीन स्थानीं तीन कमळें असुन त्यांपैकीं एक चार पाकळ्यांचें, दुसरें सहांचें व तिसरें दहा पाकळ्यांचें आहे. पहिल्या कमलाच्या पाकळ्यांवर व, श, ष आणि स, अशीं चार अक्षरें असतात; दुसऱ्याच्या दलावर ब, भ, म, ह, र आणि ल हीं सहा असतात आणि तिसऱ्याच्या दलांवर—ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प आणि फ हीं असतात ॥ ९९ ॥

नाभ्यादि कंठपर्यंतमग्निस्थानं सुशोभितम् ॥
तन्मध्ये पद्ममेकं हि हृदि स्थूलं च संज्ञितम् ॥१००

बेंबीपासून कंठापर्यंत सुशोभित असें अग्निस्थान असतें. त्यांतील हृदयदेशीं स्थल ह्या नांवाचें एक कमळ असतें ॥ १०० ॥

दलैर्द्वादशभिर्वर्णैर्युक्तमक्षरमव्ययम् ॥
ककारादिठकारान्तैर्वर्तते सर्वदेहिषु ॥ १ ॥

क पासून ठ पर्यंत जीं बारा अक्षरें त्यांनीं युक्त असलेल्या बारा पाकळ्यांचें जें कमळ अक्षर व अव्यय असून तें देही जे आहेत त्या सर्वांत असतें ॥ १०१ ॥

कंठादिभृकुटिप्रान्ते वायुस्थानं तु तत्स्मृतम् ॥
तालुमूले स्थितं पद्मं दलैः षोडशकैर्युतम् ॥ १०२॥

कंठापासून भिवईपर्यंत वायुस्थान सांगितलें असून त्यांत मुखांतील टाळ्याच्या मुळाशीं सोळा पाकळ्यांचें एक कमळ आहे ॥ १०२ ॥

स्वराः षोडशकास्तत्र तदूर्ध्वं हृदि पंकजम् ॥
एकं सूक्ष्मात्सूक्ष्मतरं चक्षुरग्रेषु शोभितम् ॥ १०३ ॥

त्याच्या त्या पाकळ्यांवर सोळा स्वर कल्पिलेले आहेत. त्याच्यावर एक हृत्कमल असून तें अति सूक्ष्म असून नेत्रांत चमकत असतें ॥ १०३ ॥

तदेव हृदयं नाम सर्वशास्त्रसुसंमतम् ॥
अन्यथा त्द्धदि किंचास्ति प्रोक्तं यत्स्थूलबुद्धिभिः ४

सर्वशास्त्रसुसंमत असें तेंच हृदय होय. स्थूल बुद्धीचे जे आहेत ते त्याचें स्थान उरःप्रदेशांत आहे असें समजतात; परंतु तें खोटें आहे ॥ १०४ ॥

रक्तं श्वेतं तथा कृष्णं नीलपीतादिशोभितम् ॥
तन्मध्ये व्यापितं येन तज्ज्योतिर्ब्रह्म केवलम्॥१०५॥

तें तांबडें, पांढरें आणि काळें अशा रंगाचें असून

निळ्या व पिवळ्या रंगांनीं सुशोभित झालेलें असतें, त्याचा मध्यभाग ज्यानें व्यापला आहे तें केवळ ज्योतिर्ब्रह्मच होय. ॥ १०५ ॥

स ब्रह्मा स शिवो विष्णुःसोऽक्षरः परमः स्वराट् ॥
सर्वे क्रीडंति तत्रैते तत्सर्वेंद्रियसंभवम् ॥ १०६ ॥

ब्रह्मा, शिव, विष्णु तेंच असून ते परम चिरायू होय हे सर्व देव त्याच्याच रूपांत क्रीडा करीत असून त्याच तत्वापासून सर्व इंद्रियें उत्पन्न झालीं आहेत ॥ १०६ ॥

आभ्रुवो ब्रह्मरंध्रान्तं स्थानमाकाशसंज्ञितम् ॥
सहस्रदलसंयुक्तं पद्मं तत्र विराजते ॥ १०७ ॥

भुंवईपासून ब्रह्मरंध्रापर्यंतच्या स्थानाला आकाश असें ह्मणतात. तेथें एक हजार पाकळ्यांचें एक कमल शोभत असतें ॥ १०७ ॥

सुषुप्तिकाळे संप्राप्ते आत्मासौ पद्ममाश्रितः ॥
यथा भानूदये सर्वे तथा देहेषु चेष्टते ॥ १०८ ॥

सुषुप्तीच्या वेळीं हा आत्मा या कमलाचा आश्रय धरून राहतो आणि सूर्योदयानंतर ज्याप्रमाणें प्राणांच्या क्रिया सुरू होतात त्याप्रमाणें त्यांतून तो बाहेर आला ह्मणजे इंद्रियांच्या क्रिया सुरू होतात ॥ १०८ ॥

भ्रुवोर्मध्ये पद्ममेकं द्विदलं तच्च शोभितं ॥
हंसमक्षरसंयुक्तं वर्तते वायुमण्डले ॥ १०९ ॥

भ्रुवमध्यांत एक दोन पाकळ्यांचें कमल फारच शोभिवंत असतें आणि त्याच्या त्या दोन दलांवर-हं आणि सः-जशीं दोन अक्षरें असून तें वायूमंडळांत असतें १०९

तन्मध्ये त्वात्मज्योतिश्च शिखेव तु विराजते ॥
नीवारशूकवत्तन्वी पीता भास्वत्यणूपमा । ११० ।

त्यांत दिव्याच्या शिखेप्रमाणें आत्मज्योति असते. ती ज्योति धान्याच्या कणसाच्या पुढें असणाऱ्या अति बारीक अशा कुसराप्रमाणें असून तिचा रंग पिंवळा असतो आणि ती देदीप्यमान व अनुपम अशी असते ॥ ११० ॥

तस्याः शिखाया मध्ये च परमात्मा व्यवस्थितः ॥
गुरोर्मुखेन ज्ञातव्यः सोऽन्यथा नोपलभ्यते ॥१११॥

त्या शिखेंत परमात्मा वास्तव्य करितो. त्याचें ज्ञान गुरुमुखावांचून होत नाहीं ॥ १११ ॥

अनेकजन्मसंस्कारात्सद्गुरुः सेव्यते बुधैः ॥
संतुष्टः श्रीगुरुर्देव आत्मरूपं प्रदर्शयेत् ॥ ११२ ॥

शहाणे लोक—अनेक जन्माच्या संस्कारामुळें सद्गुरुची सेवा करून त्याला संतुष्ट करून घेतात आणि नंतर त्याच्याकडून त्यांना आत्मरूपाचें दर्शन होतें ॥११२॥

कोटिसूर्यप्रतीकाशं चंद्रकोटिसुशीतलं ॥
यथोक्तं वेदशास्त्रैस्तद्धवेद्दृश्यं हि धीमताम् ॥ ११३ ॥

वेदशास्त्रांनीं सांगितल्याप्रमाणें-कोटीसूर्यप्रमाणें देदीप्यमान आणि कोटिचंद्रांप्रमाणें अति थंड असें तें आत्मरूप बुद्धिमंतांस मात्र दिसतें ॥ ११३ ॥

आत्मज्योतिःप्रभावेण भान्ति सोमाग्निभानवः ॥
अन्तर्बहिश्च तत्सर्वं व्याप्नोति सकलं जगत् ॥ ११४ ॥

चंद्र, अग्नि आणि सूर्य प्रकाशित होण्याला ह्या आत्मज्योतिचाच प्रभाव कारण असून त्या ज्योतीनें सर्व जगत अंतर्बाह्य असें व्यापून टाकिलें आहे ॥ ११४ ॥

एतदूर्ध्वं शून्यरूपं सहस्रदलमध्यगम् ॥
अर्धमात्रं सुविज्ञेयं प्रणवेन च भूषितम् ॥ ११५ ॥

ह्या वरील सहस्रदल कमलाध्यें शोभित असलेलें अर्ध

मात्रा युक्त शून्यरूप साक्षात जाणण्याला योग्य आहे ११५

व्याहृत्यादिक्रियाः सर्वा वर्तंते हृदि पंकजे ॥
मुख्यं स्थानमिदं ज्ञेयादात्मा तत्रैव तिष्ठति ॥११६॥

—व्याहृति वगैरे सर्व क्रिया याच हृत्कमलांत रहातात. आत्मा त्यांतच रहात असल्या कारणानें तें मुख्य आहे असें समजावें ॥ ११६ ॥

आत्मदर्शनमात्रेण जीवन्मुक्तो न संशयः ॥
तस्मात्सर्वप्रयत्नेन कर्तव्यं स्वात्मदर्शनम् ॥११७॥

आत्मदर्शनानें मानव जीवन्मुक्त होतो यांत संशय नसल्यामुळें सर्व प्रयत्नानें आत्मदर्शन करावें ॥ ११७ ॥

सूत उवाच ।

इत्युक्त्वा कपिलः श्रेष्ठः कृतार्थस्तेन संगताः ॥
ऋषिसिद्धाश्च तेऽपापा आत्मरूपे प्रतिष्ठिताः ११८

सूत म्हणतातः—इतकें बोलून विद्वान कपिल कृतार्थ झाले व त्यांच्याशीं संगत झालेले ऋषि व सिद्ध निष्पाप होऊन आत्मस्वरूपांत अधिष्ठित झाले ॥ ११८ ॥

ऋषिसिद्ध उवाच ।

हृदि पद्मे स्थितं ब्रह्म विस्तृतं कथितं त्वया ॥
शरीरलक्षणं वेदसंख्यां च कृपया वद ॥ ११९ ॥

ऋषिसिद्ध म्हणतातः—हृदयस्थ कमलांतील ब्रह्माविषयीं विस्तृत असा उपदेश तुह्मी केलात; आतां कृपाकरून शरीरलक्षण आणि वेदसंख्या आम्हांला सांगा॥११९।

कपिल उवाच ।

आपादाच्छीर्षपर्यंत मूर्तिरूपं प्रदृश्यते ॥
अकारमातृकं श्वेतत्ताम्रवर्णसुशोभितम् ॥ १२० ॥

कपिल म्हणतातः—पायांपासून मस्तकापर्यंत जें मूर्ति-

रूप दिसतें तें अकारमात्रामय असून तांबड्या रंगानें सुशोभित असतें ॥ १२० ॥

सर्वेंद्रियाणां व्यापार ऋग्वेदो वर्णितस्तथा ॥
विश्वाभिमानी संप्रोक्तो रजोगुणसमाश्रितः ॥१२१॥

सर्व इंद्रियांच्या व्यापाराला ऋग्वेद असें ह्मटलें आहे ज्यान रजोगुणाचा आश्रय केला आहे असा विश्व या अवस्थेचा अभिमानी आहे ॥ १२१ ॥

भूमितत्त्वं दृश्यरूपं स्थूलभोगस्तथैव च ॥
विपरीतज्ञानयुक्तं तत्र वाग्वैखरी मता ॥ १२२ ॥

भूमि हें त्याचें दृश्य तत्व आहे. विश्वाचा भोग स्थूल असतो. तो विपरीत ज्ञानानें युक्त असून तेथें वैखरी वाणीचा व्यवहार चालतो ॥ १२२ ॥

प्रमाणं च तथा प्रोक्तं सार्धहस्तत्रयान्वितं ॥

अवस्था जागृतिस्तत्र नेत्रे तेजो यतः स्थितम्॥१२३

त्या शरीराचें प्रमाण साडेतीन हात असून जागृति ही त्याची अवस्था असते व नेत्रांत आत्मतेज असतें ॥१२३॥

पंचभूतात्मको देहः पंचविंशतितत्त्वकः ॥
प्रत्येकं भूतमात्रं च शृणु सिद्ध महामुने ॥ १२४ ॥

हा देह पंचभूतात्मक आणि पंचवीस तत्त्वमय असून त्यांतील प्रत्येकाच्या भूतमात्रा कशा विभक्त झाल्या आहेत तें हे सिद्धमहामुने, तूं आतां श्रवण कर ॥ १२४ ॥

उत्पत्तिर्जागरो बोधो व्यावृत्तिश्च चतुर्थिका ॥
कलाचतुष्टयं चैतज्जाग्रतीत्यभिधीयते ॥ १२५ ॥

उत्पत्ति, जागर, बोध व चवथी व्यावृत्ति या चार कलांच्या समुदायाला जागृति असें ह्मणतात ॥ १२५ ॥

कामः क्रोधस्तथा लोभो भयं मोहस्तथैव च ॥

आकाशभागाः संप्रोक्ता ज्ञेयाश्चेमे मनीषिभिः १२६

काम, क्रोध, लोभ व मोह हे आकाशाचे भाग सांगितले आहेत असें विद्वानांनीं जाणावें ॥ १२६ ॥

—प्रसरणं चंचलत्वं गमनागमनं तथा ॥
भ्रमणाकुचनं पंच वायुभागा इति स्मृतम् । १२७ ।

प्रसरण, चंचलत्व, गमनागमन, भ्रमण व आकुंचन हे पांच वायुभाग सांगितले आहेत ॥ १२७ ॥

निद्रा भोगो रतिश्चैव क्षुधा तृषा तथैव च ॥
भागा आलस्यमित्येव स्थूले पंच प्रशंसिताः ।१२८।

निद्रा, भोग, रति, क्षुधा, तृषा व आळस हे तेजाचे पांच भाग सांगितले आहेत ॥ १२८ ॥

श्लेष्मा शुक्रं तथा रक्तं मूत्रं मेदस्तु पंचकम् ॥
जलभागास्तु भो विप्र इत्येवं संप्रकीर्तिताः ।१२९।

हे ब्राह्मणा, श्लेष्मा, शुक्र, रक्त, मूत्र व मेद हे पांच भाग जलाचे सांगितले आहेत ॥ १२९ ॥

रोमत्वङ्मांसनाड्यो वै अस्थीनीति तथा मताः ॥
पृथ्वीभागा इमे पंच विज्ञेयास्तु मनीषिभिः ।१३०।

केश, त्वचा, मांस, नाड्या व अस्थि हे पांच भाग पृथ्वीचे आहेत असें विद्वानांनीं जाणावें ॥ १३० ॥

इदं पंचगुणाख्यानं सविभागं सुविस्तृतम् ॥
एकैकस्य च भूतानां ज्ञातव्यं तु मनीषिभिः १३१

विस्तारपूर्वक विभागांसह सांगितलेलें हें एकेका भूताच्या पांच पांच गुणांचें आख्यान विद्वानांनीं चांगलें समजून घ्यावें ॥ १३१ ॥

इत्युक्तः स्थूलविस्तारस्तारकं नवरूपकम् ॥
व्यापकं सर्वदेहानां दृश्यते चर्मचक्षुषा ॥ १३२ ॥

या प्रमाणें हा स्थूलाचा विस्तार सांगितला. आतां
र्व देहाला व्यापणारें व डोळ्यांनांही दिसणारें तारक
वरूप सांगतों ॥ १३२ ॥

अथ सूक्ष्मशरीरं तद्वर्णव्यक्ति तथैव च ॥
स्थानं कर्म क्रियाः सर्वाः स्वस्थचित्तेन त्वं शृणु १३३

सूक्ष्म शरीर, त्याच्या वर्णाची अभिव्यक्ति, स्थान,
र्म आणि सर्व क्रिया हें सर्व तूं आतां स्वस्थांतःकरणानें
क ॥ १३३ ॥

अपंचीकृतसूतेभ्यो लिंगदेहः स उच्यते ॥
स्थानं कण्ठप्रदेशस्तु गुणः सत्वः प्रकीर्तितः॥१३४॥

पंचीकृत न केलेल्या भूतांपासून जें सूक्ष्म शरीर होतें
ाला लिंगदेह म्हणतात. त्याचें स्थान कंठ असून गुण
त्व आहे ॥ १३४ ॥

उकारमातृका तत्र स्वप्नावस्थाऽभिधीयते ॥
तत्राऽन्यथाज्ञानमस्ति वायुतत्त्वं प्रतिष्ठितम् ।१३५।

त्याची यात्रा उकार असून अवस्था स्वप्न आहे आणि त्यांत विपरीत ज्ञान होऊन तेथें वायु तत्व असतें ॥१३५॥

शुक्लवर्णात्मकं रूपं वाक्तथा मध्यमा स्मृता ॥
यजुर्वेदः स विज्ञेयो मनो वैकारिकं स्मृतम् ।१३६।

त्याचें रूप शुभ्रवर्ण असून वाणी मध्यम आहे. यजुर्वेद हा त्याचा देह असून त्यांतील मन विकार पावलेलें असतें ॥ १३६ ॥

अंगुष्ठमात्रं संप्रोक्तं साभिमानं तु तैजसम् ॥
प्रविविक्तं च भोगाख्यं शरीरं सूक्ष्मकं स्मृतम् १३७

त्याचें प्रमाण अंगुष्ठमात्र असून त्याचा अभिमानी तेजस् आहे. अवस्था सूक्ष्म भोग असल्यानें त्याला सुक्ष्म

शरीर असें म्हणतात ॥ १३७ ॥

यथं भावं समापन्नं सादृश्यं तेन तस्य वै ॥
मनो वैकारिकं सर्वं स्वभावस्था चतुष्टये ॥१३८॥

तें ह्व्या त्या उत्पन्न झालल्या भावनांच्या स्वरूपाचें होतें, त्यांतील मन वासनात्मक असून स्वभावस्था जीवांच्या संतोषाला कारण होते ॥ १३८ ॥

बुद्ध्यंतःकरणे चैव मनश्चित्तमहकृतिः ॥
आकाशभागा विज्ञेयाः पंचैवेमे मनीषिभिः ॥१३९॥

बुद्धि, अंतःकरण, मन, चित्त आणि अहंकार हे पांच भाग आकाशाचे आहेत असें शहाण्यांनीं जाणावें ॥१३९॥

व्यानः समानोदानौच प्राणापानौ तथैव च ॥
एतद्वै पंचकं प्रोक्तं वायुभागस्य पण्डितैः ॥ १४० ॥

प्राण, अपान, व्यान, उदान व समान हें वायुपंचक पंडितांनीं सांगितलें आहे. ॥ १४० ॥

श्रोत्रं त्वक्चक्षुषी जिव्हा घ्राणं पंचममेव च ॥
तेजोभागा इमे ज्ञेयाः सूक्ष्मदेहेषु चारिणः॥१४१॥

कान, त्वक्, डोळे, जीभ व नाक हे सूक्ष्म देहांत संचार करणारे पांच तेजोभाग आहेत असें जाणावें १४१

वाक्पाणिपादौ शिश्नं च गुदं वै पंचमं स्मृतम् ॥
अपां पंच विभागास्तु इमे सन्ति प्रकीर्तिताः१४२

वाचा, हात, पाय, शिस्न आणि गुद हे जड पंचक आहे असें वर्णिलें आहे ॥ १४२ ॥

शब्दः स्पर्शश्च रूपं च रसो गंधस्तथैव च ॥
एतत्तु पंचकं तत्र पृथ्वीभागस्य प्रोच्यते ॥ १४३ ॥

शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हें पृथ्वीपंचक आहे असें सांगितलें आहे ॥ १४३ ॥

पंचभिः पंचभिर्होतच्छरीरं लिंगसंज्ञितम ॥

यत्स्थानं कण्ठदेशश्च यच्च सूक्ष्मतरं स्मृतम् ॥१४४॥

ज्याचें स्थान कंठ असून जें अति सूक्ष्म ह्मणून सांगि-
तलें आहे असें तें हें लिंगसंज्ञित शरीर अशा पांच पंच-
कांनीं व्याप्त आहे ॥ १४४ ॥

स्थूलदेहस्य मध्यस्थाः श्वेतवर्णविराजितः ॥
जीवाः क्रीडति तत्रैव तदूर्ध्वं हृदि सूक्ष्मकम् १४५॥

स्थूल देहाच्या मध्यभागीं श्वेतवर्ण विरजित असून
आंतच जीव खेळत असतो. त्यावर हृदयांत सूक्ष्म तत्व
असतें ॥ १४५ ॥

शरीरं कारणं चास्ते पंचविंशतितत्त्वकम् ॥
गुणरूप तथा वर्णस्थानकर्माणि दैवतम् ॥ १४६ ॥

तेंच पंचवीस तावाचें कारण शरीर आहे. त्याचे गुण
रूप, वर्ण, स्थान, कर्म, दैवत ॥ १४६ ॥

तत्सर्वं कथयिष्यामि स्वस्थचित्तेन संशृणु ॥
कारणं हृदयस्थाने तमोगुणसमुद्भवम् ॥ १४७ ॥

इत्यादि आता सर्व सांगेन तें स्वस्थांतःकरणें ऐक. कारण शरीर हृदयस्थानांत असून त्याची उत्पत्ती तमोगुणापासून झालेली आहे ॥ १४७ ॥

प्राज्ञोऽभिमानी तत्रस्थो भोग आनंद एव च ॥
मकारमातृका यत्र अवस्था तु सुषुप्तिका ॥ १४८ ॥

त्यांतील अभिमानी प्राज्ञ हा असून तो आनंदोपभोग घेतो. त्याची अवस्था सुषुप्ति आहे ॥ १४८ ॥

अज्ञानं तेजसस्तत्त्वं कृष्णरूपं च दृश्यते ॥
देहः पर्वार्धमात्रो हि पश्यन्ती वाक् च संस्मृता ॥

त्यांत अज्ञान कृष्णरूप व तेजाचें तत्व दिसतें. त्याचें प्रमाण अर्धपर्वमात्र असून वाणी पश्यंति सांगितली आहे ४९

सामवेदस्तु विज्ञेयो हृदि पद्मे सुशोभितम् ॥
तेजोमयं मण्डलं च वर्तते सर्वदेहिनाम् ॥ १५० ॥

त्याचा वेद सामवेद असून सर्व देहधाऱ्यांच्या हृत्कमळांत सुशोभित असें तेजोमय मंडळ असतें ॥ १५० ॥

मरणं विस्मृतिर्मूर्च्छा निद्रा च तमसावृता ॥
कलाचतुष्टययुता सुषुप्तीत्यभिधीयते ॥ १५१ ॥

मरण, विस्मृति, मूर्च्छा, व त्यानें व्यापलेली झोंप या चार कलांनीं युक्त अशी सुषुप्ति असते असें सांगतात.

अवकाशो विस्मृतिश्चाऽवरणं निरावरणम् ॥
प्रमाणत्वमिमे भागा आकाशस्य प्रकीर्तिताः ।१५२।

अवकाश, विस्मृति, आवरण, निरावरण व प्रमाणत्व हे अकाशाचे भाग सांगितले आहेत ॥ १५२ ॥

भ्रांतिः शंका शोषणं च शीतलीकरणं तथा ॥

धीरत्वमिति पंचैव वायुभागाः प्रकीर्तिताः ॥१५३॥

भ्रांति, शंका, शोषण शिथिलीकरण आणि धीरत्व हे वायूचे भाग आहेत ॥ १५३ ॥

गूढरूढकृतघ्नत्वान्यविचारश्चतुर्थकः ॥

सक्लेशत्वमिमे पंच तेजोभागाः प्रशंसिताः ॥१५४॥

गूढपणा , रूढपणा, कृतघ्नपणा, अविचार आणि सक्लेशपणा हें तेजपंचक सांगितलें आहे ॥ १५४ ॥

मृदुत्वं शोषणत्वं च हलाहलत्वमेव च ॥

क्लेदनं धारणत्वं च जलभागाः प्रशंसिताः ॥१५५॥

मृदुत्व, शोषणत्व, हलाहलत्व, क्लेदन व धारण हे जलाचे भाग आहेत ॥ १५५ ॥

मूढत्वं च बळित्वं च लज्जावत्वं तृतीयकम् ॥

मृदत्व, बलित्व, लज्जावत्व, पिंडीकरण व काठिण्य हें पंचक ॥ १५६ ॥

एवं हि पंचकं प्रोक्तं पृथ्वीभागस्य कोविदैः ॥
हृद्येवं कारणं ज्ञेयं शरीरं तु तृतीयकम् ॥ १५७ ॥

हें पृथ्वीभागाचें पंचक आहे असें विद्वानांनीं सांगितलें आहे. याप्रमाणें तिसरें कारण शरीर हृदयांत असतें १५७

एतदूर्ध्वं तु देहेषु महाकारणमुच्यते ॥
स्थानमैश्वरमाख्यातं जीवत्वं तत्र लीयते ॥१५८ ॥

देहामध्यें या तिसऱ्या शरीरावर महाकारण ह्मणून एक शरीर असतें. त्याचें स्थान ऐश्वर सांगितलेलें असून त्यांत जीवत्व लीन होतें ॥ १५८ ॥

तत्सर्वं शृणु भो विप्र विस्तृतं कथयाम्यहम् ॥
शुद्धसत्वगुणं प्रोक्तं प्रत्यगात्माभिमानिनम् ।१६

हे ब्राह्मणांनो, आतां तेंच मी सविस्तर सांगतों. त्यांत शुद्ध व सत्व गुण असून त्याचा अभिमानी प्रत्यगात्मा आहे ॥ १५९ ॥

स्थानं मूर्धेति विज्ञेयं तथा भोगावभासकम् ॥
तुर्यावस्था ह्यर्धमात्रा विवेकज्ञानमाश्रिता ॥ १६० ॥

त्याचें स्थान मूर्धा असें समजावें. तें भोगाचें अवभासक असून त्याची अवस्था तुर्या आणि मात्रा अर्धमान असून तिला विवेकज्ञानाचा आश्रय आहे ॥ १६० ॥

दृश्यरूपं वायुतत्त्वं नीलवर्णं विराजते ॥
देहो मसुरमात्रस्तु परा वाणी ह्यथर्वणः ॥ १६१ ॥

दृश्य हें त्याचें स्वरूप असून वायुतत्त्व आणि नीलवर्ण शोभत असतो. मसुरप्रमाण देह असून वाणी अथर्वणरूप परा आहे ॥ १६१ ॥

महाकारणदेहोऽयं वर्तते वायुमण्डले ॥
कला चाष्टदला प्रोक्ता महाकारणसंज्ञिता ॥१६२॥

हा महाकारण देह वायुमंडळांत असून त्याची महाकारण नांवाची कळा आठ पाकळ्यांची असते ॥१६२॥

वैराग्यं च मुमुक्षुत्वमात्मत्वं तत्त्वदर्शनम् ॥
कलाचतुष्टयं चैव तुर्यावस्थाऽभिधीयते ॥ १६३ ॥

वैराग्य, मुमुक्षुत्व, आत्मत्व आणि तत्त्वदर्शन ह्या कलाचतुष्टयाला तुर्यावस्था ह्मणतात ॥ १६३ ॥

असंगत्वं च पूर्णत्वं व्यापकत्वं तृतीयकम् ॥
सर्वबीजमखण्डत्वमिदमाकाशपंचकम् ॥ १६४ ॥

असंगत्व, पूर्णत्व, व्यापकत्व, सर्वबीजत्व आणि अखंडत्व हें आकाशपंचक त्यांत असतें ॥ १६४ ॥

अच्छेद्यत्वमजत्वं च परात्परत्वनैर्मल्यं ॥

अजरत्वमिमे पंच वायुभागाः प्रशंसिताः ॥ १६५ ॥

अच्छेदत्व, अजत्व, परात्परत्व, नैर्मल्य आणि अजरत्व
हा त्यांतल्या वायूच्या पांच गुणांची प्रसंशा केली आहे

ऊर्ध्वयदमदाह्यत्वं प्रकाशत्वं तथैव च ॥
चैतन्यं च त्वनर्घ्यत्वं तेजोभागाः प्रकीर्तिताः॥१६६।

उर्ध्वस्थानीं रहाणें, अदाह्यत्व, प्रकाश, चैतन्य आणि
अनर्घ्य हे पांच महाकारणांतील जलभाग आहेत ॥१६६।

अक्लेद्यविश्वजीवत्वे ज्योतीरसत्वमेव च ॥
कारुण्यममृतत्वं च ह्यपां भागास्तु पंच वै ॥ १६७।

अक्लेद्य, विश्वजीवत्व, ज्योतिरसत्व, कारुण्य व अमृतत्व
हें महाकारणस्थ जलपंचक आहे ॥ १६७ ॥

अशोष्यत्वं कारणत्वं पावनत्वमिति स्मृतम् ॥
आधारत्वं समृधत्वं पृथ्वीभागाः प्रशंसिताः ॥१६-

अशोष्यत्व, कारणत्व, पावनत्व, आधारत्व आणि समृद्धत्व असे पृथ्वीचे पांच भाग आहेत ॥ १६८ ॥

विस्तरेण हि संप्रोक्तमंशतत्त्वं तु यद्भवेत् ॥
तदेव सर्वतत्त्वेषु महाकारणमुच्यते ॥ १६९ ॥

येणेंप्रमाणें हें अंशतत्त्व सविस्तर सांगितलें तेंच सर्व तत्त्वांतील महाकारण आहे असें सांगितलें आहे ॥१७९॥

देहमध्ये महाश्रेष्ठो नारिकेलफलाम्बुवत् ॥
आंतरादान्तरः प्रोक्तः सर्वत्राऽऽत्मा समास्थितः ॥

नारळांतील पाण्याप्रमाणें देहामध्यें सर्वत्र अगदीं आंत आंत तो महश्रेष्ट आत्मा स्थित आहे, असें सांगितलें आहे ॥ १७० ॥

त्रिपुरक्रीडया ब्राह्मे जीवेत्याख्यं स गच्छति ॥
जहदजहद्भावात्तु सैष जीवः सदाशिवः ॥ १७१ ॥

तीन अवस्थांमध्यें बाह्यपुरांत त्या आत्म्याला जीव असें ह्मणतात; परंतु तो त्यावेळीं आपला शुद्ध भाव सोडून सत्रादि धर्म सोडीत नसल्याळें तोच जीव सदाशिव होतो ॥ १७१ ॥

त्रिपुरक्रीडतश्चान्तो ह्यवस्था तून्मनी ततः ॥
शब्दो न जायते तत्र लक्षणा च तृतीयका॥१७२॥

स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन पुरांतील क्रीडेच्या पलीकडची उन्मनी अवस्था आहे, त्यांत शब्दाची प्रवृत्ति होत नाहीं. त्याच्या उन्मनप्राप्तीकरितां तिसरी जहदजह-लक्षणा करावी लागते ॥ १७२ ॥

तत्वमसीति विज्ञानं देहेऽस्मिन्नु चतुर्थके ॥
गुरुमुखेन ज्ञातव्यं ह्यन्यथा प्राप्यते कथम्॥ १७३ ॥

तत्वमसि या महावाक्याचें ज्ञान वरील लक्षणेनें या

चवध्या शरीरांतच होतें. तो लक्षणेचा प्रकार गुरुमुखानें समजून घ्यावा. त्याशिवाय तो कसा समजणार ? ॥१७३॥

तस्मात्सर्वप्रयत्नेन कर्तव्यं स्वात्मदर्शनम् ॥
अहं देहो जीव इति धीः सर्वैस्त्यज्यतामियम् १७४

म्हणून सर्व प्रयत्नानें आत्मदर्शन करावें. देह हाच मी जीव आहें ही बुद्धी सगळ्यांनीं सोडावी ॥ १७४ ॥

चतुरशीतिलक्षेषु योनियंत्रेषु गच्छतः ॥
प्राप्तं ते मानवं जन्म भवेदानीं सुखात्मकः ।१७५।

चौऱ्याशीं लक्ष योनी फिरून हा मानवजन्म नंतर प्राप्त झाला आहे, तर हे मानवा, आतां तू सुखरूप हो ।१७५।

साक्षात्कारात्स्थिरं चित्तं जायते लीनमात्मनि ॥
तदैव जायते जन्तोर्जन्ममृत्युविनाशनम् ॥ १७६ ॥

आत्मसाक्षात्कार झाला असतां स्थिर झालें असलेलें

चित्त आत्म्यांत लीन होतें आणि नंतर तत्काळ प्राण्याच्या जन्ममृत्यूचा नाश होतो ॥ १७६ ॥

देहनिर्णयस्थाने च वर्णव्यक्तिस्तथैव हि ॥
प्रमाणं सर्वतत्त्वानि वर्णितानि त्वया गुरो ॥१७७॥

ऋषिसिद्ध म्हणतातः—देहाचा निर्णय, त्यांचीं स्थानें, वर्णांची व्यक्ति, प्रमाण आणि सर्व तत्वें, हे प्रभो, आपण सांगितलीं ॥ १७७ ॥

गुरूक्तिश्रवणेनैव जीवबुद्धिर्विलीयते ॥
आत्मवत्सर्वभूतानि यस्य तस्यात्मदर्शनम् ।१७८।

गुरूचें भाषण ऐकतांच मी देह ही बुद्धी नष्ट होते. सर्व भूतें ज्याला आपल्यासारखीं वाटतात त्याला आत्मदर्शन होतें ॥ १७८ ॥

शरीरं वेदसंख्यं च ज्ञात्वा तव प्रसादतः ॥
आकाशे ह्यर्धभागे च मण्डलं वायुसंज्ञकम् ॥१७९॥

आपल्या कृपेनें चार प्रकारचें शरीर समजलें. आकाशाच्या अर्ध्या मार्गांत वायु नांवाचें मंडल आहे ॥१७९॥

पद्मं च द्विदलाकारं चक्षुर्नामेति कथ्यते ॥
तन्मध्ये सर्वसारं च ज्ञात्वा धन्योऽस्मि भो मुने १८०

त्यांत द्विदलाकार कमल असून त्याचें चक्षु असें नांव सांगतात. त्यांत सर्वसार असून तें समजल्यामुळें मी धन्य झालों आहें ॥ १८० ॥

जात्यंधानां दृष्टिमध्ये फलपुष्पाद्युपाधितः ॥
आत्मनो दर्शनं न स्यादनात्मानो हि ते किमु १८१

जन्मांधाच्या डोळ्यांत फूल पडल्यानें अगर वडस वाढल्यानें त्यांना रूपवान पदार्थांकडून आत्मदर्शन होणें शक्य नाहीं तेव्हां तें आत्मदर्शनाशिवाय रहाणार कीं काय ? ॥ १८१ ॥

गमनादिक्रियास्तस्य जायंते तत्कथं वद ॥
अनात्मा स तु नो वाच्यस्तस्य ज्योतिः क वर्तते १८२

अशा जन्मांधाच्या गमनभाषणादि क्रिया कशा होतात तें सांगा. त्या क्रिया करणाराला जर अनात्मा म्हणतां येत नाहीं तर त्याची ज्योति कोठें असते? ॥ १८२ ॥

चतुर्देहसमायुक्तं सर्वतत्वैः सुमिश्रितम् ॥
पंचप्राणसमायुक्तं वपुस्तस्य कथं चरेत् ॥ १८३ ॥

चार देहांनीं युक्त, सर्वतत्वमिश्रित आणि पंचप्राणांचा असा त्याचा पिंड व्यवहार कसा करितो? ॥ १८३ ॥

एवं च प्राप्तं संदेहमेतं छिन्धि ह्यसंशयम् ॥
वाचा मंजुलया देव मनःशांतिर्यया भवेत् ॥१८४॥

हा मला जो संशय आला आहे त्याचा नाश करून मला निःसंशय करा. देवा, जिच्या योगानें मनःशांति होईल अशा गोड आवाजानें माझें शांतवन करा ॥१८४॥

कपिल उवाच ।

अमुं प्रश्न महाश्चर्यं पूर्वं कोऽपि न पृष्टवान् ॥
ऋषिसिद्धगणाः सर्वे श्रोतुमिच्छन्ति तावतः ।१८५।

कपिल ह्मणतातः—अशा तऱ्हेचा आश्चर्यकारक श्न पूर्वी कोणीही विचारलेला नाहीं. सर्व ऋषिसिद्धगण याचें तत्वतः श्रवण करून घेण्याची इच्छा करितात १८५

इतिज्ञात्वा प्रवक्ष्यामि विना किंचिद्धि वंचनात् ॥
श्रोतुं सम्यक् स्वस्थबुद्ध्या चित्तमेकाग्रतां नय १८६

हें जाणून कांहीं एक छळ न करितां मी तें सांगेन पण तें स्वस्थ बुद्धीनें चांगल्या प्रकारें ऐकण्याकरितां तूं आपलें चित्त एकाग्र कर ॥१८६॥

गर्भांधत्वे दृष्टिमध्ये कारणं पुष्पपटलम् ॥
संप्रोक्तं हि त्वया शिष्य कं तद्देहत्रयं गतम् १८७

शिष्या, जन्मांध होण्याचें कारण, डोळयांत फूल पडणें वगैरे तूं सांगितलेंस; पण मीं सांगितलेले तीन देह कोठें गेले ? ॥ १८७ ॥

तस्यात्मा क नु तिष्ठेत्स व्यापारं कथमाचरेत् ॥
इत्यव प्रश्नो युष्माकं मत्तस्तत्रोत्तरं शृणु ॥ १८८ ॥

त्याचा आत्मा कोठें उभा राहील आणि त्याचा व्यापार कसा चालेल हा तुमचा प्रश्न आहे. आतां त्याचें उत्तर ऐका

धात्रा ह वै सृष्टिरियमास्तिस्थावरजंगमा ॥
प्रारब्धत्वानुसारेण निर्मिता पंचभौतिका । १८९ ।

ही स्थावर जंगमात्मक पंचभौतिक सृष्टि ब्रह्मदेवानें प्राण्यांच्या प्रारब्धाप्रमाणें निर्माण केली आहे ॥ १८९ ॥

जळजाश्च नवलक्षयोनयो बहुनामकाः ॥
जलूका नाम तत्राऽऽस्ते नेत्रकर्णविवार्जिता । १९० ।

जलचर प्राण्यांच्या नऊलक्षयोनी असून त्यांचीं अनेक नांवें आहेत. त्यांतला जळू नांवाचा प्राणी नेत्र व कर्ण यांविरहित असतो ॥ १९० ॥

श्रवणं दर्शनं तस्या आहारगमनादयः ॥
जिव्हात्वग्भ्यां च युक्ताया भवंत्यष्टेंद्रियैः सह १९१

जीभ आणि कातडी यांनीं युक्त असलेल्या त्या जळवेच्या–दर्शन, श्रवण, आहार, गमन इत्यादि क्रिया आठ इंद्रियांनींच होतात ॥ १९१ ॥

एवं सर्पो विना कर्णं पाणिपादौ तथैव च ॥
श्रवणं कुरुते दृष्ट्या गच्छति ह्युरसापि सः १९२

त्याचप्रमाणें सर्प हा कान, हात, पाय यांशिवाय असूनही तो डोळ्यांनीं ऐकतो, उरानें सरपटत चालतो ॥

स्थावराणां लतादीनां ज्ञायते बंधनं खलु ॥

त्वगिंद्रियबलं श्रेष्ठं तेष्वास्ते केवलं तु वै ॥ ११३ ॥

लतादि स्थावर पदार्थांत अनिष्ट वस्तूंचें ज्ञान होतें म्हणून त्यांच्या ठिकाणीं नुसतें श्रेष्ठ त्वगिंद्रिय बळ असतें

प्रत्यहं वृद्धिक्षीणत्वे फलपुष्पे तथैव च ॥
देहोऽस्ति तेषां सर्वेषां सूक्ष्मादिः सर्वकर्मणाम् १९४

तेव्हां त्यांची वृद्धि व क्षय ही होत असतात. त्याप्रमाणें त्यांना फुलें व फळें येतात; म्हणून सर्व कर्मे करणाऱ्या त्या सर्वांस सूक्ष्मादि महाकारण देह आहेत १९४

स्थूलस्यान्तः सूक्ष्मभूतं तथा च प्राणपंचकम् ॥
गर्भांधस्याखिलं त्वस्ति कथं तज्ज्ञायतेऽबुधैः १९५

जन्मांधाच्या स्थूल देहांतर्गत जसा सूक्ष्म देह असतो त्याचप्रमाणें प्राणपंचकही असतो; पण ही सूक्ष्म आणि विचारानेंच समजणारी गोष्ट मूर्खांस कशी समजणार ?

नेत्रस्थाने स्थिते देहवर्णव्यक्तिस्तु वर्तते ॥
साभिमानं तृतीयं च व्यापाराः स्थूलदेहवत् १९६
नेत्रस्थानीं असलेल्या सूक्ष्म देहांत रूपाची अभिव्यक्ति तिसरें ठिकाण असून स्थूल देहाप्रमाणेंच त्याच्याही सूक्ष्म देहाचा व्यवहार होत असतो ॥ १९६ ॥

आंतरे त्रिपुरक्रीडां कुर्वन् व्याप्नोति देहिनः ॥
तथात्मा संस्थितोऽन्धस्य देहे तस्येति लक्षणम् १९७
डोळस प्राण्याच्या अंतरात्रिपुरांत क्रीडा करणारा आत्मा जसा त्याच्या शरीराला व्यापून रहातो तद्वतच अंधळ्याच्याही देहांत असतो. दोहोंचेंही लक्षण एकच॥१९७॥

दृष्ट्यालापादिव्यापारा वृक्षादिषु भवंति हि ॥
जलमध्ये स्थितं पद्ममाकाशे भानुरस्ति च १९८
पहाणें, भाषण करणें वगैरे क्रिया वृक्षादिकांतही

होतात पाण्यांत जसें कमळ असतें तद्वत् आकाशांत सूर्य असतो ॥ १९८ ॥

मित्रदर्शनसंतोषात्पद्मजालं विकाशते ॥
सूर्यकान्ताख्यपुष्पं च तस्याभिमुखमाटाति ॥१९९॥

सूर्य दर्शनाच्या संतोषानें कमळें विकसित होतात, व सूर्यकांत नांवचें फूल तर त्याच्या गतीप्रमाणें फिरत असतें

दृष्टिशब्दादि वृक्षाणां नेति शंका वृक्षा कृता ॥
रंभाप्रसूतिकाले तु शब्दस्तस्याः प्रशस्यते २००

केळ जेव्हां विते तेव्हां तिचा शब्द स्पष्ट हो असें असतां, दृष्टि, शब्द इत्यादि वृक्षांच्या ठायीं नाहींत असें अडाणी व्यर्थ ह्मणतात ॥ २०० ॥

इंद्रियं ईंद्रियं धृत्वा सर्वकार्यें प्रवर्तते ॥
गर्भांधस्य तथा ज्ञानं प्रोक्तं ज्ञेयं विचक्षणैः २०१

ज्याला जें इंद्रिय नसतें त्याचें तें कार्य दुसरें इंद्रिय करितें. या नियमाला अनुसरून गर्भांधालाही सर्व प्रकारचें ज्ञान होतें असें विद्वानांनीं सांगून ठेविलें आहे ॥ २०१ ॥

पश्चात्प्रारब्धभोगेन देहात्तन्तरं भविष्यति ॥
सर्वेंद्रियसमायुक्तः स्वस्यदेहं स आप्नुयात् ॥२०२॥

अंधत्व प्रादा करणारा प्रारब्ध दोष एक देहांत घालवून तो दुसरा देह धारण करतो आणि त्याचा तो मग सर्व इंद्रियांनीं युक्त असणारा देह सर्व इंद्रियांचीं कार्यें सुरळीतपणें करूं शकतो ॥ २०२ ॥

मध्येंऽघदृष्टेराघातात्तथाऽप्यात्मवतः खलु ॥
अंतर्दृष्ट्या यथा ज्ञानी तथांधो जहि संशयम् २०३

प्रारब्धभोग बलवत्तर असल्यामुळें मध्येंच एकाद्या जन्मांत दृष्टिनाश झाला तरी तो आत्मवान् असल्यामुळें

ज्ञात्याप्रमाणें अंतर्दृष्टीनें युक्त असतो याविषयी तूं संशय धरूं नको । २०३ ॥

शंभौ तृतीयकं नेत्रमग्निरूपं प्रतिष्ठितम् ॥
दग्धोऽनंगस्तु वै येन ज्ञाननेत्रं तदेव च ॥२०४॥

शंकराला तिसरा जो नेत्र आहे तो अग्निरूप असल्यामुळें सदाशिवानें त्यानेंच मदनाला जाळिलें. त्याचतोच ज्ञाननेत्र होय ॥ २०४ ॥

शरीरं वेदसंख्याकं तत्त्वानि शतक तथा ॥
भस्मीभूतशरीरस्य वर्णरूपे कुतस्तदा ॥ २०५ ॥

चार देहांच्या समूहरूप अशा त्या मदनाचें शरीर आणि शंभर तत्त्वें या सर्वांचें भस्म झाल्यावर त्याला वर्ण आणि रूप मग कोठून रहाणार ? । २०५ ॥

अनंगोऽदेहरूपोऽपि व्याप्नोति सकलं जगत् ॥
उत्पत्तिः सर्वजंतूनां वर्धतेऽहर्निशं ततः ॥ २०६ ॥

अनंग म्हणजे विन देहाचा मदन जरी देहधारी नाहीं तरी त्यानें सर्व जग व्यापिलें असून सर्व प्राण्यांची उत्पति त्याच्यापासूनच भरोगात्र होत असते ॥ २०६ ॥

तदा रूपशरीरादि नेन किंचिन्न दृश्यते ॥
क्रियाकर्मगुणाः सर्वे भवंत्यस्मिस्तथापि च २०७

त्याचें रूप, शरीर वगैरे जरी कांहीं दिसत नाहीं तरी याची क्रिया, अवस्था, गुण इत्यादि सर्व शरीरांत होतात ॥ २०७ ॥

विश्वव्यापी चांतरात्मा सर्वदेहेऽस्य विद्यते ॥
प्राणादिसर्वतत्त्वानि तिष्ठन्ति च यथास्थितम् २०८

विश्वव्यापी अंतरात्मा अंधाच्या सर्व देहांत असतो. प्राणादि सर्व तत्वें त्यांत यथास्थितपणें रहातात ॥२०८॥

रूपावलोकनमात्रं व्यापकं ध्रुवमस्य न ॥
चलनस्पर्शनज्ञानं तत्राऽऽस्तेऽसंशयं बुध ॥२०९॥

व्यापकरूप दर्शन जरी त्याला होत नाहीं तरी चलन, स्पर्शन इत्यादि ज्ञान त्याला निःसंशय असतें ॥ २०९ ॥

सोपाधित्वाद्दृष्टिमध्ये वर्णत्रयं न दृश्यते ॥
तत्त्वे तत्त्वं समाश्रित्य तिष्ठत्यखिलदेहिषु ॥२१०॥

त्याची दृष्टि दूषित असल्यामुळें त्याला तीन वर्ण दिसत नाहींत पण हा जीवात्मा सर्व देहधारी प्राण्यांत तत्त्वांत तत्त्वाचा आश्रय करून रमातो ॥ २१० ॥

एवमस्तीह वृत्तांतो वृथा प्रश्नकृतो वचः ॥
प्रश्नद्वयं ह्युर्वरितं स्वस्थं शृणु मुनीश्वर ॥ २११ ॥

एकंदरींत काय कीं, अशी जेथें स्थिति आहे तेथें अंधत्वाबद्दलचा प्रश्न व्यर्थच होय. आतां त्यासबधीं दोन प्रश्न उरले आहेत त्याचें उत्तर मुनीश्वरा, तुम्ही स्वस्थांतःकरणानें ऐका ॥ २११ ॥

सृष्टेरुत्पत्तिकाले तु भानुसोमौ च निर्मितौ ॥
आकाशे भ्राम्यतो नित्यं लोकोपकृतिकारणात् ॥
सृष्टीच्या उत्पत्तिकालीं विधात्यानें सूर्य व चंद्र यांना निर्माण केलें. लोकांवर उपकार करण्याकरितां ते सदोदित आकाशांत फिरतात ॥ २१२ ॥

पर्जन्यकाले संप्राप्ते मेघाडम्बरतः खलु ॥
तथा मण्डलमदृश्यं का हानिर्नाम वै तयोः॥२१३॥
परंतु पर्जन्यकाच प्राप्त झाला असतां मेघांच्या अवडं-बरामुळें त्यांची हानी ती कोणती आहे? ॥ २१३ ॥

कल्पान्ते सोमभान्वोश्चजायते न च दर्शनम् ॥
कंचित्कालं स्थिता मेघा नश्यंत्यपि च कालतः ॥
कल्पांतीं चंद्रसूर्याचें जरी दर्शन होत नाहीं तरी कांहीं काल असणारे मेघ योग्यकाळीं नाहींसे होतात हें सर्वांना

माहीत आहे ॥ २१४ ॥

तथैव भ्रान्तिनाशे हि चतुर्देहा विनाशिताः ॥
एवं पटलपुष्पादेर्विचारो वर्णितो मया ॥ २१५ ॥

तद्वत् भ्रांतीचा नाश झाला म्हणजे चारी देह अधित होतात. सारांश मीं नेत्रांतील फूल वडस इत्यादिकांचा विचार सविस्तर वर्णिला ॥ २१५ ॥

पूर्वजन्मकृतं पापं व्याधिरूपेण दृश्यते ॥
स्थूलेषु गजचर्मादि ग्रंथिरूपादिकं तथा ॥२१६॥

पूर्वजन्मीं केलेलें पाप व्याधिरूपानें स्पष्ट दिसतें. स्थूलदेहावर गजकर्णादि त्वचा रोग, गळवें, खरूज वगैरे पूर्वीच्या पापामुळेंच मानवाला प्राप्त होतात ॥ २१६ ॥

विकाराद्रुधिरस्यैव वर्णहान्यादि जायते ॥
औषधापचनेनैव पूर्वदेहसंभवः ॥ २१७ ॥

रक्तदोषामुळेंच वर्णहानी वगैरे होतात व औषधींच्या प्रयोगानें त्यांचा नाश होऊन पुन्हां देह पूर्ववत् होतो २१७

नेत्रे विकाराज्जायेते पुष्पं च पटलादिकम् ॥
देहत्रयसमाधारे तत्र हानिः कथं तदा ॥ २१८ ॥

विकारामुळें नेत्रांत फूल पडतें, सारा येतो व इतरही व्याधि होतात; परंतु जीवात्म्याला तीन देहांचा आश्रय नाहींसा होत नाहीं ॥ २१८ ॥

अंजनादिप्रयोगस्तु कर्तव्यस्तत्र बुद्धिभिः ॥
यथापूर्वं भवेद्दृष्टिः सूक्ष्मात्सूक्ष्मस्य दर्शने ॥२१९॥

नेत्रदोष जाण्याकरितां अंजनादिकांचा उपयोग विचारपूर्वक करावा म्हणजे पूर्ववत् दृष्टी होऊन ती सूक्ष्माहून सूक्ष्महो बघण्यास समर्थ होते ॥ २१९ ॥

स्थूलेषु प्राप्यते व्याधिस्तत्रोपायं समाचरेत् ॥

सूक्ष्मेषु जायते रोगश्चिकित्सा क्रियतां ततः २२०

स्थूल शरीरांत व्याधि उत्पन्न होते म्हणून जसा स्थूल शरीरांतच उपाय करावा लागतो, त्याचप्रमाणें सूक्ष्म शरीरांत रोग झाल्यास त्याचीच चिकित्सा करणें योग्य होय ॥ २२० ॥

उभयोरुपचारेण शरीरे स्वास्थ्यमुद्भवेत् ॥
शरीरारोग्यतः सर्वं भवेत् सुखमयं तदा ॥ २२१ ॥

स्थूल आणि सूक्ष्म अशा दोन्ही शरीरांतील रोगांचा उपचारांनीं नाश करून टाकल्यावर शरीराचें आरोग्य होऊन सर्व सुखमय होतें ॥ २२१ ॥

पश्वादीनां च दृष्ट्यादि सर्वं यद्यपि वर्तते ॥
तथापि नाऽत्मनो ज्ञानमेवं द्वैतप्रियस्य वै ॥२२२॥

पश्वादिकांत दृष्ट्यादि सर्व जरी आहेत तरी त्यांना

आत्मज्ञान होत नसल्यामुळें द्वैतप्रिय पुरुषाप्रमाणें तीं सर्व ज्ञानाचीं अनधिकारी असतात ॥ २२२ ॥

चिदात्मा सर्वदेहेषु ज्योतीरूपेण व्यापकः ॥
तज्ज्योतिश्चक्षुरग्रेषु गुरुनेत्रेण दृश्यते ॥ २२३ ॥

सर्व देहामध्यें चिदात्मा ज्योतिरूपानें व्यापक आहे. त्याची जी ज्योति नेत्राच्या अग्रभागीं असते ती गुरूच्या नेत्रानें दिसते ॥ २२३ ॥

स मुक्तो यो विजानाति वेदवेदान्तनिश्चितम् ॥
मथित्वा सर्वशास्त्रं यत्पार्वतीं प्रतिबोधितम् २२४

सर्व शास्त्राचें मंथन करून शंकरांनीं पार्वतीला जें सांगितलें आणि वेदवेदांतांत जें निश्चित आहे त्या तत्वाला जो ओळखतो तो मुक्त होतो ॥ २२४ ॥

शंकरेण प्रसन्नेन तथा वस्तुप्रदर्शितम् ॥

ज्योतीरूपं स्वरूपं यत्तस्मान्माया न वै पृथक् २२५

शंकरांनीं प्रसन्न होऊन जी ज्योतिरूप मुळ वस्तु दाखविली ती व माया हीं पृथक् नाहीत, एकच आहेत

अभेदाद्गुरुशिष्याणां सर्वत्रैक्यं प्रदृश्यते ॥

गुरुशिष्यस्वरूपेण क्रीडति स्वेच्छयेश्वरः ॥२२६॥

गुरुशिष्यांच्या ऐक्यानें सर्वत्र साक्षात्कार होतो गुरु-शिष्यस्वरूपानें ईश्वर स्वेच्छेनें क्रीडा करीत असतो ॥२२६

तत्त्वं पार्थस्य कृष्णेन ह्युद्धवस्य हितेन च ॥

ब्रह्मादिसनकादीनां हंसरूपेण बोधितम् ॥ २२७ ॥

भगवंतानें हेंच तत्व अर्जुन आणि उद्धव यांना सांगितलें. ब्रह्मदेव, सनकादिक यांसही त्या परमात्म्यानें हंसगीतेंत हेंच सांगितलें आहे ॥ २२७ ॥

दत्तात्रेयादिसिद्धानां नवनाथैस्तथैव च ॥

शंकरो गुरुरूपेण ब्रह्माभिज्ञेन बोधितः ॥ २२८ ॥
दत्तात्रेयादि सिद्धांना नवनाथांनीं याचाच उपदेश केला
निधान ब्रह्मज्ञानें गुरुरूपानें शंकराला याचाच बोध केला
सीतावियोगकाले तु रामस्योक्तं शिवेन वै ॥
परशुरामस्य तत्तत्त्वं दत्तात्रेयेण बोधितम् ॥२२९॥
सीतावियोगाच्या वेळीं शंकरांनीं रामाला हेंच सांगितलें
च परमतत्व परशुरामाला दत्तात्रेयांनीं अनुग्रहसमयीं
सांगितलें ॥ २२९ ॥

अन्ये च बहवो भक्ता मुक्ता गुरुकृपावशात् ॥
तथा न ते भेदयुक्ता मूर्खा देहाभिमानिनः २३
असेच इतर अनेक भक्त गुरुकृपेनें मुक्त झाले आहेत
ते मूर्ख भेददृष्टि व देहाभिमानी नव्हते ॥ २३० ॥
देहस्यान्तर्गतो ह्यात्मा देहमध्ये सदास्थितः ॥

तस्माद्देहात्मको नाम प्रख्यातः सर्वलौकिकैः २३

देहाच्या आंत असणारा आत्मा देहांत कसा असतो, तें दाखविलें आहे म्हणूनच सर्व लोकांनीं देहात्मक य नांवानें त्याचें वर्णन केलें आहे ॥ २३१ ॥

आत्मेति चाक्षरो नाम शररूपं शरीरकं ॥
ॐकारसदृशं रूपं देहात्मेति प्रगीयते ॥ २३२ ॥

आत्मा हा अक्षर म्हणजे अविनाशी असून शरीर विनाशी आहे. ॐ हें एकाक्षररूप ब्रह्म असल्यामुळें तें देहधर्मास कसें पात्र होईल ? ॥ २३२ ॥

पंचमहाभूतात्मको देहो भूतात्मा नाम कथ्यते ॥
ॐकारतुल्य रूपासच देहात्मा म्हणतात ॥ २३३ ॥

तारकं देहरूपाख्यं मत्यक्षं वर्णितं मया ॥
नैवप्रणवसंयुक्तं नवरूपं तु तारकं ॥ २३४ ॥

मी प्रत्यक्ष देहरूप नामक तारकाचें वर्णन केलें आहे.
ॐ प्रणवांनीं युक्त असलेल्या तारकाला नवरूप तारक
सें म्हणतात ॥ २३४ ॥

काशीपुरीनिवासी स विश्वनाथो जगद्गुरु ॥
देहान्ते चोपदिशते दक्षिणे कर्णसंपुटे ॥ २३५ ॥

काशीपुरींत राहणारा तो जगद्गुरु विश्वनाथ मरण-
मयीं याच तारकाचा उपदेश भक्ताच्या उजव्या कानांत
रतो ॥ २३५ ॥

केनापि न कृताः प्रश्न ईदृशो भुवनत्रये ॥
तत्र सर्वं त्वयाऽऽख्यातं गुह्याद्गुह्यतरं महत् २३६

अशा प्रकारचा प्रश्न त्रिभुवनांतही कोणी कोणाला
ला नव्हता; पण तो तूं मला केलास म्हणून मीं हें
ति गुह्य व महत् असें सर्व तत्व तुला सांगितलें ॥२३६

ॐ तत्तत्त्वं सोहं रामः सोहं तत्त्वम् ॥
ॐ तत्त्वमासि रामायनमः ॥ ॐ तत्त्वं रामोसि ॥
शरीरं च भवेदात्मा अंतरात्मा भवेन्मन ॥
परमात्मा भयेच्छून्यं मनो तत्र विलीयते ॥
ॐ तत्सत्ब्रह्मार्पणमस्तु ॥ * ॥ समाप्त.

याप्रमाणें पद्मपुराणांतील सिद्धांतसारापैकीं कपिलऋषि-
ऋषिसंवदांतील राजराजेश्वरयोग नांवाच्या पांचव्या
अध्यायाचें व्याख्यान येथें समाप्त झालं.
ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु.

---

शके १८३६ सं. १९१४
प्रकाशक—पंढरीनाथ नारायण करंदीकर मुकाम मुरुड
ता० दापोली जि० रत्नागिरी.
मुद्रक—विनायक पांडुरंग गोठोस्कर.
सु-वर्ण प्रिंटिंग प्रेस. ६२ कॉव्हेल मुंबई नं. २